॥ श्रीसमर्थ ॥

भिषक्चूडामणि

# कै० विष्णु कृष्णशास्त्री पुराणिक यांचें विवेचक चरित्र


लेखक

**सदाशिव कृष्ण फडके, राहणार पनवेल.**

[ नवयुगधर्म खंड १ ला ब्राह्मसमाज आणि देवसमाज यांचा विवेचक इतिहास, श्रीमद्दयानंद चरित्र, श्रीदत्तभक्तरहस्य, श्रीजीवन्मुक्त व आधुनिक तत्त्वज्ञ, मायावाद आणि अजातवाद, मनोबोध आणि नवा मनु इत्यादि पुस्तकांचे कर्ते. ]



प्रकाशक

**गंगाधर विष्णु पुराणिक, राहणार पनवेल.**

आवृत्ति पहिली.

शाके १८५५.

78/1933

किंमत दोन रुपये.


NATIONAL LIBRARY
No. 12833
Date 30-9-66
CALCUTTA
LISTED
B

हें पुस्तक पुणें पेठ भांबुर्डा घ. नं. ९३६।३ येथें आर्यभूषण छापखान्यांत
रा. रा. **अनंत विनायक पटवर्धन**, बी. ए. यांनीं छापलें व
रा. रा. **गंगाधर विष्णु पुराणिक**, राहणार पनवेल,
यांनीं पनवेल येथें प्रसिद्ध केलें.



**श्रीधूतपापेश्वर.**

[पनवेल येथील श्रीधूतपापेश्वर आरोग्य मंदिरांतील मूर्ति.]

॥ श्रीसमर्थ ॥

तीर्थरूप कैलासवासी विष्णु कृष्णशास्त्री पुराणिक
यांच्या पुण्यस्मरणात्मक

त्यांच्या एका विद्वान प्रिय गुरुबंधूकडून मुद्दाम लिहवून
घेतलेलें हें उद्बोधक चरित्र

---

# श्रीसद्गुरु समर्थ रघुनाथशास्त्री
ऊर्फ
# काका महाराज पुराणिक

यांच्या पुण्यतिथीच्या मंगलदिनीं
आमचे कुलदेव व आर्यौषधि
कारखान्याचे आराध्य देव

# श्रीधूतपापेश्वर

यांचे चरणीं
अत्यंत नम्रपणें अर्पण केलें असे.

गंगाधर विष्णु पुराणिक
प्रकाशक.



कै० विष्णु कृष्णशास्त्री ऊर्फ तात्यासाहेब पुराणिक,---पनवेल.

[पृ. ५

# अनुक्रमणिका.

॥ श्रीसमर्थ ॥




ह्या चरित्रग्रंथाची विस्तृत प्रस्तावना चरित्र–लेखकांनीं स्वतंत्र लिहिलीच आहे. पण या ग्रंथप्रकाशनाचे निमित्तानें मला विशेषेंकरून बृहन्महाराष्ट्राशीं आपला परिचय करून घेऊन त्यांस आपलें हृद्गत सांगण्याची जी सुसंधि आली आहे, ती मी व्यर्थ दवडूं नये, असें वाटतें. आत्मीय भावनेनें दोन शब्द लिहावे, हा प्रेमाचा मोह न आवरून मी पुढील चार ओळी लिहीत आहें.

ह्या चरित्राचे नायक ती. कै. विष्णु कृष्णशास्त्री ऊर्फ तात्यासाहेब पुराणिक हे माझे वडील. ते सन १९१४ सालीं वारले, त्यावेळीं मी अवघा सात वर्षांचा होतों. तें बालपण व त्यानंतरचीं बारा पंधरा वर्षे विद्याभ्यासांतच गेलीं. आर्यांग्ल वैद्यकांत, व रसायनशास्त्रांत निष्णात व्हावें अशी माझी फार महत्त्वाकांक्षा होती. पण मी मेडिकल कॉलेजांत असतांना सन १९२७ सालीं माझे पालक व माझे वडिलांचे पश्चात् श्रीधूतपापेश्वर कारखान्याचे प्रतिनिधि व चालक ती. कै. भाऊसाहेब पुराणिक यांस पक्षघाताचा विकार झाला! यामुळें मला शिक्षणक्रम अपुराच सोडून घरीं येणें भाग पडलें. त्यावेळीं माझ्या अननुभवी अल्प वयांत मजवर मोठीच जबाबदारी येऊन पडली. पूर्वीं मी पनवेलीस असलों तरी माझें राहाणें, माझे चुल-

त्यांचे घरापासून व श्रीधूतपापेश्वर आयौषधी कारखान्यापासून दूर पाऊण मैलावर असे. यामुळें मला घरच्या व्यवहारासंबंधीं व कारखान्याचे व्यवस्थेसंबंधीं विशेष कांहींच माहिती नसे. अशा स्थितींत वरीलप्रमाणें मजवर एकाएकीं जबाबदारी आल्यामुळें मी हळूहळू चुलत्यांचे सल्ल्यानें घरचा व कारखान्याचा व्यवहार पाहूं लागलों. ईशकृपेनें मला सल्लामसलत देतां येण्याइतपत चुलत्यांची प्रकृतीहि सुधारली. त्यामुळें त्यांच्या मदतीनें मी तीन चार वर्षांत कारखान्यासंबंधीं पुरा माहीतगार झालों.

पूर्वीं बालस्वभावामुळें व विस्मृतिकारक निर्घृणकालाच्या प्रभावानें वडिलांची स्मृति माझ्या विद्याव्यासंगी मनांत अस्पष्ट झाली होती. पण पुढें मी जेव्हां कारखान्यांत फिरून रोज कारखान्याचा सर्व व्यवहार पाहूं लागलों, तेव्हां त्या कारखान्याचे संस्थापकांची मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर अक्षय्य दिसूं लागली! हा कारखाना ज्यांनीं स्थापन केला व वाढविला त्या संस्थापकांना किती आविश्रांत श्रम करावे लागले असतील! हे विचार वरचेवर मनांत येऊन त्यांच्या संबंधानें प्रेमादरानें अंतःकरण भरून येई! वडिलांनीं कारखान्याची अशी कांहीं यंत्रासारखी संघटित लावली होती कीं, त्यामुळें रुळावरची गाडी लोटण्यास जसे थोडे श्रम पुरतात, तसा कारखाना नुसता चालू ठेवण्यास चालकास विशेष आयास पडत नसत. याप्रमाणें मजवर अकालींच पडलेली जबाबदारी मी वल्हवीत आहें, ह्यांत माझें विशेष कांहींच कर्तृत्व नसून ही वडिलांचीच पुण्याई आहे, अशी माझी खातरी होऊन माझें तरुण मन पितृभक्तीनें नम्र झालें!

या समयास, मी येथें ज्या इंग्रजी शाळेंत शिकलों त्या 'कोंकण एज्युकेशन सोसायटीच्या' शाळेंतील माझे प्रिय मुख्याध्यापक गुरुवर्य गणेश दामोदर टिल्लू एम्. ए. यांनीं मला असें कळविलें कीं, सोसायटीच्या त्रैमासिकांत छापण्याकरितां मी माझ्या परमपूज्य वडिलांचें चरित्र लिहून पाठवावें. मला ही गोष्ट अर्थात् मोठ्या आवडीची व अभिमानास्पद वाटली. पण लिहिण्यास बसलों तों वडिलांचें चरित्र काय लिहावें, तें मला सुचेना! अशा कर्तृत्ववान् वडिलांचे चरित्रहि पूर्णपणें माहीत नसावें ही गोष्ट मला लज्जास्पद वाटली! तेव्हां मी या चरित्राचे लेखकांस भेटलों. "तात्यांचें

चरित्र इतक्या अपुऱ्या माहितीचें लिहिणें बरें नाहीं. पुरी माहिती गोळा करून त्यांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध करावें तेंच बरें." असें त्यांचें म्हणणें पडलें.

मग चरित्राची माहिती जमविण्यास आरंभ केला. तेव्हां वडिलांचें विस्तृत चरित्र अवश्य प्रसिद्ध करावें असें अनेकांकडून उत्तेजन मिळूं लागलें व तें चरित्र लोकांस वाचावयास हवें आहे, ही गोष्ट मला कळून आली. चरित्रलेखनाचें काम करण्यास श्रीयुत बाबासाहेब फडके हेच सर्वस्वी लायक व समर्थ होते. त्यांच्याशिवाय हें चरित्र दुसरे कोणा-सच लिहितां येणें शक्य नव्हतें. श्रीयुत बाबासाहेब यांचा माझे वडिलांशीं सन १८९८ सालापासून परिचय होता. सन १९०५ सालीं ते पनवेलीस येऊन वकिली करूं लागले, त्यानंतर तर वडिलांचे वकील, गुरुबंधु, स्नेहि व सल्लागार अशा अनेक नात्यांनीं त्यांचा अति निकटचा संबंध जडला. आपण होऊन पुढें पुढें न करितां पडद्याआड राहून महत्त्वाची कामगिरी करण्याची त्यांची हातोटी आहे. ती. कै. तात्यांना अंगीकृत कार्या-विषयीं इतरांशीं विचारविनिमय करण्याचें फार अगत्य वाटे. निदान पन-वेलमध्यें तरी श्री. बाबासाहेब यांच्याइतकें एतद्विषयक उच्च प्रतीचें साहाय्य त्यांस दुसऱ्या कोणाकडूनहि मिळालें नसावें, असें मला वाटतें.

माझ्या अज्ञानदशेंत कारखान्याचे फारच वाढलेले दप्तरी कागद नाश करितांना चरित्राला ज्यांचा फार उपयोग झाला असता असे बरेच कागद नाहींसे झाले! त्यावेळीं संस्थेचा इतिहास किंवा संस्थापकांचें चरित्र लिहि-ण्याची कल्पना कोणाचेच मनांत नसावी. वडील निवर्तल्यानंतर मध्यंतरीं फारच काळ गेल्यामुळें त्यांचे विशेष संबंधीं घराण्यांतील समकालीन ग्रामस्थही फारसे राहिले नाहींत. यामुळें त्यांच्या चरित्रलेखनाला पुरेशी माहिती मिळणें फारच कठीण झालें. श्री. बाबासाहेब यांनीं माहिती गोळा करण्याकरितां कांहीं प्रश्नपत्रिका तयार केल्या त्या ठिकाठिकाणच्या परिचित गृह-स्थांकडे पाठवून शक्य ती माहिती मिळविली. तथापि त्या माहितीचें स्वरूप तात्यांचें गुणवर्णन अशाच स्वरूपाचें असे. चरित्राला जरूर लागणारी तपशि-लवार भरपूर माहिती मिळणें अशक्यच झालें. प्रसिद्ध करावयाच्या चरित्रांत

शोभेल व उपयोगी होईल अशी तपशिलवार माहिती कालानुक्रमानें व्यवस्थित लिहून देणें हें काम वाटतें तितकें सोपें नाहीं. यामुळें घरच्या व बाहेरच्या नातलग मंडळींकडूनहि भरपूर सामुग्री मिळाली नाहीं. अशा अडचणीचे स्थितींत चरित्रांत योग्य विषयांचा भरणा करून चरित्राची सजावट करण्याचे कामीं श्री. बाबासाहेब यांजसारखे अगत्याचे व माहितगार असे कसलेले लेखक मिळाले, त्यामुळेंच चरित्रलेखन शक्य झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

श्री. बाबासाहेब यांचा आवडीचा विषय सनातनी धर्म व तत्त्वज्ञान हा आहे. अलीकडे याच विषयाचे चिंतनांत ते सदा मग्न असल्यामुळें या चरित्रांतहि तो विषय आधिक्यानें येणें कांहींसें अपरिहार्यच झालें. त्याचप्रमाणें त्यांचे शिक्षणविषयक विचार कोणास अप्रिय होण्याचा संभव आहे. परंतु सदोषशिक्षणपद्धतींतील दोष दिग्दर्शित करण्यास भाषा कडक वापरणें पुष्कळ वेळां भागच पडतें. त्याशिवाय ती परिणामकारक होत नाहीं. त्यांच्या नवयुगधर्ममालेंत त्यांनीं सनातनी व आर्यसंस्कृतीबद्दलच्या अभिमानाचा जो चष्मा घातला आहे तो या चरित्रलेखनाचे वेळीं शक्य तर काढून ठेवावा व जेणेंकरून प्रवृत्तीचा उत्साह वाढेल असें चरित्र लिहावें असें त्यांस तात्यांचे मेव्हणे श्री. आत्मारामपंत खेर [ बी. ए. रिटायर्ड डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर ] यांनीं सुचविलें होतें. पण या चष्म्यावांचून श्री. बाबासाहेब यांना त्यांच्या या उतार वयांत कांहीं दिसतच नाहीं! असा त्यांचा निरुपाय झालेला दिसतो. तरी लेखकाची ही दृष्टि लक्षांत ठेवून वाचकांनीं चरित्र वाचावें, अशी विनंति आहे.

या चरित्रासंबंधीं माहिती देण्यासाठीं मीं केलेल्या विनंतीला मान देऊन ज्यांनीं अगत्यपूर्वक माहिती पुरविली त्या सर्वांचा मी फार आभारी आहें. त्या सर्वांच्याच नांवांचा उल्लेख विस्तारभयास्तव येथें करितां येत नाहीं. पण त्यांतहि धोपेश्वरचे श्री. भालचंद्र शिवराम करंबेळकर, राजापूरचे श्री. श्रीकृष्ण विठ्ठल भागवत वकील, व चेंबूरचे श्री. वासुदेव कृष्ण सांडू यांनीं आपलेकडील कै. तात्यांचा अस्सल पत्रव्यवहार पाठवून चरित्रलेखनास फारच मोठी मदत केली, त्याबद्दल मी त्यांचा फार फार आभारी आहें.



कै० रामचंद्र कृष्ण ऊर्फ भाऊसाहेब पुराणिक.

[ पृ. १२

त्याचप्रमाणें आर्यभूषण छापखान्यानें फारच थोड्या मुदतींत चरित्राच्या छपाईचें कांम फार चांगल्या रीतीनें करून दिलें त्याबद्दल त्यांचेहि आभार मानणें जरूर आहे.

श्री. बाबासाहेब फडके हे माझ्या हितासंबंधीं व श्रीधूतपापेश्वर संस्थेसंबंधीं इतके एकजीव झाले आहेत कीं, चरित्रलेखक म्हणून त्यांचे मी आभार मानणें म्हणजे डावे हातानें उजव्या हाताचे आभार मानण्याप्रमाणेंच होईल. त्यांना तें आवडत नाहीं. त्यांचें छायाचित्र यांत यावें असा माझा आग्रह होता. पण ते आपला फोटो काढून देत नाहींत. यामुळें माझा निरुपाय झाला!

वडिलांच्या निधनानंतर म्हणजे इ. स. १९१४ नंतर माझे पूज्य पितृव्य ती. कै. रामचंद्र कृष्ण ऊर्फ भाऊसाहेब पुराणिक यांनी श्रीधूतपापेश्वर कारखाना या संस्थेचा व आमच्या सर्व कुटुंबाचा योग्य प्रकारें सांभाळ केला, व पुराणिक घराण्याच्या कीर्तीत आपल्या औदार्यानें भर घातली. श्रीधूतपापेश्वर आयुर्वेद ट्रस्ट या संस्थेच्या कामींही त्यांच्या सल्ल्याची फार मदत झाली. त्यांच्या सल्ल्यानेंच हें चरित्र लिहिण्यास घेतलें व त्याच्या छपाईस ते असतांच सुरुवात झाली. पण त्यानंतर ता. १४ ऑगष्ट १९३३ रोजीं ते एकाएकीं कालवश झाले! ते आज हें चरित्र पुरें झालेलें पाहण्यास हयात नाहींत याबद्दल फार खेद वाटतो।

श्रीधूतपापेश्वर संस्थेचा या पूर्वीचा इतिहास दोन पिढ्यांत सांठविलेला आहे. या चरित्राकरितां मुद्दाम शोधपूर्वक मिळविलेल्या माहितीप्रमाणें पहिल्या पिढीनें संवत १९२९ सालीं संस्थेचें बीजारोपण केलें व दुसऱ्या पिढीनें संस्थेचें आजवर संगोपन केलें. त्यास आतां साठ वर्षें पुरीं झालीं. संवत १९९० कार्तिक शुद्ध प्रतिपदा, हा वर्षारंभाचा दिवस अत्यंत महत्त्वाचा आहे. तो संस्थेचा वर्षारंभ आहे. संस्थेचे मुख्य पुरस्कर्ते व आधारस्तंभ श्रीसद्गुरु समर्थ काकामहाराज पुराणिक यांच्या पुण्यतिथीचा तोच दिवस आहे. अशा महत्त्वाच्या दिवशीं हें संस्थेच्या संस्थापकांचें व चालकांचें ऐतिहासिक चरित्र प्रसिद्ध करून मी बृहन्महाराष्ट्राचे हातीं देत आहें. वडिलांच्या नांवावर मी माझ्या प्रिय प्रांतीय बंधूंचें हृदयकपाट उघडून आंत येऊं पाहात आहें! वडिलांच्या पुण्याईवर

व श्रीशिव-गुरुकृपेवर उभारलेल्या या उपयुक्त संस्थेसंबंधीं कोणाचे कांहीं गैरसमज असतील तर ते दूर व्हावेत व या संस्थेसंबंधीं सर्वांची सहानुभूति असावी अशी माझी विनंती आहे. ह्या संस्थेच्या यापुढील विस्ताराचें जोखमाचें काम ज्या ह्या तिसऱ्या पिढीच्या हातीं ईशसंकेतानें आलें आहे, ते आमचे अननुभवी हात बृहन्महाराष्ट्राचे प्रेमळ आशीर्वादानें समर्थ होवोत, अशी जनता जनार्दनाजवळ माझी अत्यंत नम्रभावानें प्रार्थना आहे !

अखेर मी माझ्या अल्प बुद्धीनें केलेल्या माझ्या परमपूज्य तीर्थरूपांच्या या वाङ्मय श्राद्धास "तृप्तास्मः । सर्वमच्छिद्रं भवतु" असा आशीर्वाद त्यांनीं द्यावा, असें त्यांस नम्रभावानें विनवीत असतां अंतःकरण सद्गदित होऊन लेखन कुंठित होतें !

पनवेल,
अश्विन शु. १५
कोजागरी शके १८५५

गंगाधर विष्णु पुराणिक.
प्रकाशक.

॥ श्रीसमर्थ ॥



# प्रस्तावना.

ज्यांनीं मला श्रीसद्गुरूंच्या पायांवर घालून कृतार्थ केलें, त्या माझ्या कर्तृत्ववान् गुरुबंधूंचें चरित्र आज पुरें करितांना मला फार आनंद होत आहे. माझ्या चरित्रनायकाचे मनांतून श्रीसद्गुरूंचें चरित्र मीं लिहावें, असें फार होतें. पण तशी परवानगी श्रींकडून मिळणें शक्य नव्हतें. म्हणून त्यांनीं श्रींस विचारलें कीं, "आम्हीं परमगुरूंचें चरित्र लिहावें काय?" 'लिहा बापडें' अशा अर्थाचें श्रींनीं उत्तर दिलें. रामचरित्र लिहितांना हनुमंताचें चरित्र ओघानेंच येतें. त्याप्रमाणें परमगुरूंचें चरित्र लिहितांना श्रीसद्गुरूंचें चरित्र त्यांत लिहितां येईल, अशी त्यांनीं अप्रत्यक्ष परवानगी गर्भित मानली. परंतु तें चरित्रलेखन झालें नाहीं. तें या चरित्रांत साधावें असें माझ्या कांहीं गुरुबंधूंनीं फार आग्रहपूर्वक सांगितल्यावरून मी उलट सच्छिष्याच्या चरित्राच्या निमित्तानें श्रीसद्गुरु व परमगुरु यांचींहि संक्षिप्त चरित्रें या ग्रंथांत संकलित केलीं आहेत. ही आयती सुसंधी मला मिळाली हें मी माझें परम भाग्य समजतों.

माझ्या आतांपर्यंतच्या लेखनव्यवसायांत आर्थिक दृष्टीनें मी इतका नुकसानींत आलों आहें कीं यापुढें निदान स्वतांचे जोखमावर ग्रंथ लिहून प्रसिद्ध करण्याची कल्पनाहि मला अशक्यप्रायच वाटत आहे! गेल्या जून अखेर मीं चार वेदान्तपर ग्रंथ प्रसिद्ध केले. त्या ग्रंथांचा विद्वानांकडून अथवा सामान्य वाचकवर्गाकडून अद्याप पुरस्कार झाला नाहीं. यामस्थ आणि आप्त इष्ट तर माझ्या ह्या अपयशी प्रयत्नांबद्दल माझा उपहास किंवा कींव करीत

असतील ! व्यावहारिक दृष्टीनें जो अपयशी झाला त्याचें सारेंच चुकत गेलें, असें त्याचे आप्त-इष्ट-मित्र समजतात ! यामुळें त्याचे प्रयत्न त्याच व्यावहारिक दृष्टीनें विचार करितां कौटुंबिक आपत्तीस कारण होतातसें दिसतें. म्हणून इतःपर हा व्यवसाय पुढें चालवून कौटुंबिकांची व इष्टमित्रांची तीव्र अप्रीति संपादन करण्यापेक्षां स्वस्थ बसावें तें बरें असेंच ठरविणें मला भाग पडलें.

परंतु हा माझा निश्चय होण्याचे पूर्वींच या चरित्रासंबंधींची माहिती गोळा करण्याचा उपक्रम प्रकाशकांकडून सुरू झाला होता. व कित्येकांकडून त्याप्रमाणें माहितीहि थोडथोडी येत होती. शक्य ती माहिती गोळा झाल्यावर तें चरित्र मींच लिहावें असें प्रकाशकांचें म्हणणें होतें. ती गोष्ट मीं कबूल केली असल्यामुळें अंगाबाहेर टाकणें मलाहि शक्य नव्हतें. म्हणून प्रकाशकांच्या सांगण्या-वरून गेल्या जुलैअखेर मी हें चरित्र लिहिण्यास घेतलें.

हें चरित्र लिहित असतांना [ १ ] कर्त्यापुरुषासंबंधीं कौटुंबिकांकडून व जनतेकडून होणारा अन्याय, [ २ ] विद्यार्थ्यासंबंधीं शिक्षणविषयक पुढाऱ्यांकडून होत असलेली दिशाभूल [ ३ ] सांप्रदायिकांचा भ्रम [ ४ ] गुरुशिष्य-संबंध [ ५ ] प्रपंच आणि परमार्थ अशा कांहीं जिव्हाळ्याच्या प्रश्नांवर माझे मनांत वारंवार विचार येत व तेच लेखनांत प्रगट होण्यास पहात होते. त्याचप्रमाणें प्रकाशकाचे दृष्टीनेंहि श्रीधूतपापेश्वर कारखाना व त्याचे संस्थापक यांचा संबंध स्पष्ट करणें बरेंच अगत्याचें झालें होतें.

माझ्या नवयुगधर्ममालेंतील सारीं पुस्तकें आधुनिक सुशिक्षित तरुणांकरितांच मी लिहिलेलीं आहेत. आतां हा तरुण वर्ग माझीं पुस्तकें क्वचितच वाचीत असेल व जे क्वचित वाचीत असतील त्या त्या आधुनिक तरुणांस तीं क्वचितच पटत असतील असें अनुभवाअंतीं मला कळून आलें. ह्या वाङ्मयसेवेसंबंधीं मी ज्यांच्याकडून विशेष सहानुभूतीची अपेक्षा केली, त्यांनीं जवळ जवळ जाणूनबुजून माझ्या ग्रंथांबद्धल तिटकारा निदान औदासिन्य दाखविलें ! प्रेम आणि द्वेष या एकाच स्वकर्तृत्वाच्या नाण्याच्या दोन बाजवा असतात. रुपया उडविला असतां मुखवटा वर कधींच येऊं नये, हा कदाचित माझा दुर्भाग्ययोग असेल ! माझ्या ग्रंथांचें यथातथ्य सविस्तर परीक्षण करणारे असे अद्याप मला कोणी लाभले नाहींत. जे क्वचित् कोठें टीकाकार

आढळतात ते टकिाकार माझे ग्रंथ समग्र वाचीत नाहींत व मी हे ग्रंथ काय दृष्टीनें लिहित आहें, हें मी ठिकठिकाणीं स्पष्ट केलें असतांहि तिकडे मुळींच लक्ष देत नाहींत. तात्पर्य, आचारविचार दृष्टीनें आज जनता जिकडे वाहवत चालली आहे त्याच्याहि दहा पावलें पुढें आपण वाहवत गेलें, तरच जनतेच्या पाठिंब्याचा लाभ आपल्याला सहजीं मिळेल, एरव्हीं मिळणार नाहीं; असाच मला अनुभव आला. कार्यनिष्ठा व लोकरंजन ह्या दोन्ही गोष्टी साधणें मला तरी अशक्यप्राय झालें. म्हणून मीं तो नादच सोडला! पण आतां या चरित्रलेखनाचे प्रसंगानें पुन्हां तेच प्रश्न पुढें आले आणि त्यांत दुसऱ्या प्रकाशकाकरितां ग्रंथ लिहून छापण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें पारतंत्र्याची जबाबदारी मला प्रथम तरी बरीच जाणवली. तरी पण पुढें पुढें प्रकाशकांनीं मला बरेंच लेखनस्वातंत्र्य दिलें, हेंहि येथें नमूद करणें योग्य आहे.

हें चरित्र सामान्य व्यावहारिक दृष्टीनें लिहावें, व्यापारी दृष्टीनें लिहावें, धर्मदृष्टीनें किंवा तात्त्विक दृष्टीनें लिहावें? तसेंच हें केवळ विद्यार्थ्यांकरितां लिहावें, केवळ चरित्रनायकाच्या परिचितांकरितां लिहावें, किंवा सामान्य वाचकांकरितां लिहावें? असे अनेक प्रश्न माझ्या मनांत उद्भवले. प्रत्येक प्रश्नाला धरून चरित्रलेखनकार्यांत अनेक अडचणी होत्या. वरील कोणत्याहि एका दृष्टीनें चरित्र लिहिण्यास पुरेशी तपशिलवार निश्चित स्वरूपाची माहिती मिळणें अशक्य होतें. या चरित्राचे प्रकाशक, चरित्रनायकांचे चिरंजीव, श्री. नानासाहेब पुराणिक हे चरित्रनायक निवर्तले तेव्हां अवघे सात वर्षांचे होते. त्यांच्या घरीं चरित्रनायकाचे चरित्रासंबंधीं तपशिलवार व व्यवस्थित माहिती देणारें कोणी नव्हतें. चरित्राला पुरेशी निश्चित स्वरूपाची तपशिलवार माहिती कालानुक्रमानें सांगणें हें क्वचितच कोणाला साधतें. चरित्रनायक निवर्तल्याला हें विसावें वर्ष सुरू आहे. त्या पूर्वींची लेखी दुसरी माहिती रद्दी समजून प्रकाशकाचे अज्ञानदशेंत इतरांना त्याचें महत्त्व न कळल्यामुळें गहाळ झाली! यामुळें वरील कोणत्याहि दृष्टीनें चरित्र मुद्देसूद रीतीनें कालानुक्रमानें पुरें करणें जवळ जवळ अशक्य झालें.

कौटुंबिक आठवणी क्वचित कोणी सांगे. पण तो आठवणींचा संग्रह चरित्रास योग्य व पुरेसा नव्हता. जे पुरुष असाधारण लोकप्रीतीचें अगोदरच केंद्र बनलेले असतात त्यांच्या सामान्य आठवणीहि लोक प्रेमपुरःसर वाचतात. लोकमान्यांच्या दिवाणखान्यांतील कोनाड्यांत अडकित्त्या व सुपारी सदा पडलेली असे आणि राजाराम शास्त्री भागवत रस्त्यांतून चालतांना हात उडवीत चालत, अशा सामान्य आठवणीहि मनोरंजक वाटतात. जिनसीवाल्यांचा सोटा आणि विजापुरकरांची घोंगडी मी कधीं विसरणार नाहीं. पण माझ्या चरित्रनायकाप्रमाणें जे पुरुष वर्तमानपत्री जगांत फारसे कोणाच्या नजरेसहि पडले नाहीत, त्यांच्या चरित्रांतील सामान्य गोष्टींस महत्त्व येत नाहीं आणि विशेष गोष्टींचें वैचित्र्यहि अशा एकदेशी चरित्रांत फारसें नसतें. यामुळें केवळ चरित्रांतील ठळक गोष्टींचेंच टांचण करावें तर तें चरित्र मुद्दाम प्रसिद्ध करण्यासारखें होत नाहीं. शिवाय पनवेलसारख्या लहानशा गांवांतील जी प्रमुख व्यक्ति नुकतीच पावशतकाचे आंत दिवंगत झाली, त्या व्यक्तीचें चरित्र लिहितांना अनेक ग्रामस्थांचें व इतर स्थानिक प्रसंगांचें वर्णन करणें भागच पडतें. पण तें कित्येकांना आवडत नाहीं, कित्येकांना पटत नाहीं, कित्येकांचीं मनें त्यामुळें दुखविलीं जातात. हे प्रकार, लोकमान्यांसारख्या थोर पुरुषांचें चरित्र श्री. तात्यासाहेब केळकरांसारख्या पूर्ण माहितगार लेखकानें लिहिलें असतांना त्यानंतर जी चर्चात्मक टीका झाली, त्यावरून वाचकांच्या लक्षांत येतीलच. लिहितांना कितीहि जपलें तरी ही टीका अपरिहार्यच असते. अशा अनेक अडचणी मला भासत होत्या. पनवेलच्या आर्यौषधि कारखान्याचें नांव पुष्कळांच्या कानावर होतें. पण कारखान्याचे संस्थापक फारसे कोणाचे नजरेपुढें नव्हते.

हेंच कारण चरित्र लिहून प्रसिद्ध करण्याची आवश्यकताही दर्शवीत होतें. ह्या चरित्रनायकासारख्या विशेष कार्यकर्त्या पुरुषाचें चरित्र अप्रसिद्ध राहिल्यानें जनता एका चांगल्या आदर्शाला अंतरत होती. ती उणीव दूर करणें कोणा तरी लेखकाचें हौशीचें काम होतें व माझें तें एक अवश्य कर्तव्य होतें म्हणून तें मीं हातीं घेतलें.

पनवेलच्या पुराणिकांच्या आर्योषधि कारखान्याला कारखाना हें प्रसिद्ध स्वरूप संवत १९२९ सालीं आलें. त्याचसालीं त्यांची पहिली जाहिरात ठाण्याचे अरुणोदय नामक वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली. अर्थात कारखान्याला आतां साठ वर्षें पुरीं झालीं. या साठ वर्षांचे नंतर ज्या अनेक महत्त्वाच्या गोष्टी करण्याचें श्री. नानासाहेब पुराणिक यांनीं मनांत आणलें,त्यांत कारखान्याचे संस्थापक व त्यांचे वडील कै. विष्णुशास्त्री पुराणिक यांचें चरित्र छापून येत्या कार्तिक शुद्ध १ ला प्रसिद्ध करावें असें त्यांनीं ठरविलें. हें स्मारक कारखान्याच्या मोठेपणास व श्री. नानासाहेब यांच्यासारख्या भाग्यशाली सत्पुत्राच्या महत्त्वाकांक्षेस शोभेसेंच व्हावयास पाहिजे होतें. परंतु मध्यंतरीं आगस्ट आणि सप्टेंबर हे अवघे दोनच महिने राहिले. या दोन महिन्यांत सर्व माहिती संकलित करून चरित्र लिहून छापावयाचें हें काम किती दुर्घट होतें, याची वाचकांनींच कल्पना करावी. त्यांतही या मुदतींत माझ्या पाठीमागें अनेक विवंचना आणि व्याप होतेच ! परंतु श्री. नानासाहेब यांचें जसें हें एक पवित्र कर्तव्य होतें, तसें चरित्रनायक माझे गुरुबंधु, व एक हितचिंतक या नात्यांनीं माझेंहि तें एक अवश्य कर्तव्यच होतें. म्हणून श्रीसद्गुरूंची प्रार्थना करून एकीकडे लेखन व लगेच छपाई असें दुहेरी काम सुरू केलें. छपाईच्या अखेरपर्यंत माझें लेखनहि सुरूच होतें. तें इतकें कीं मला या या ग्रंथाच्या अखेरच्या 'अखेर' या प्रकरणानंतर 'नंतर' 'लोकमत' व 'उपसंहार' हीं तीन मोठीं प्रकरणें लिहून छापावयाचीं तीं तशींच राहिलीं ! वेळाचे अभावीं असें करणें भागच झालें. तसेंच ग्रंथ अगोदर पुरा करून शुद्ध व दुरुस्त करून मग तो छापण्यास तयार केला असतां त्यांत जो आटोपशीरपणा व सुसंबद्धपणा येतो, तसा या ग्रंथास आणतां येणें, अशक्य झालें.

माझ्या ह्या चरित्रनायकांचा व श्रीसद्गुरूंचा उपासनाग्रंथ अध्यात्मरामायण हा होता. त्या ग्रंथांत कथाप्रसंगाचे अनुरोधानें मुद्दाम अध्यात्मविषय गोंवला आहे. म्हणूनच त्याचें नांव अध्यात्मरामायण असें आहे. तोच आदर्श कांहींसा पुढें ठेवून त्याचप्रमाणें या चरित्रग्रंथांत चरित्राचे अनुरोधानें जेथें सवड मिळाली तेथें त्या सवडीचा पूर्ण फायदा घेऊन मानवी जीवनरहस्यासंबंधीं सामान्य स्फुट विचार या चरित्रांत ठिकठिकाणीं गोंवले आहेत.

त्यायोगानें चरित्रनायकासंबंधीं पुरे माहितगार व गैर माहितगार अशा दोन्हीं प्रकारच्या वाचकांस ह्या चरित्रग्रंथ वाचनीय व मननीय वाटेल अशी आशा आहे. येथें हेंहि लिहिणें अवश्य वाटतें कीं, हें एका उद्योगी पुरुषाचें, एका कारखानदाराचें चरित्र आहे, अर्थात् त्यांच्या जीवनचरित्राबरोबर त्यांच्या कारखान्याची वाढ व इतर तपशील देणें क्रमप्राप्तच आहे. सामान्य वाचकांस तें क्वचित् कंटाळवाणें झाल्यास त्यास लेखकाचा निरुपाय आहे.

चरित्र व चित्र कोणाचेंहि असो, त्या चरित्रांत व चित्रांत चरित्रकार किंवा चित्रकार याचीहि छाया दिसूं लागते. रविवर्मा, धुरंधर आणि मुल्लर ह्यांचे हात त्यांनीं काढलेल्या हिंदी स्त्रियांच्या चित्रांत स्पष्ट दिसतात, हरि नारायण आपटे आणि प्रो. फडके ह्यांचीं छाया चित्रें त्यांच्या कादंबऱ्यांतून ओळखूं येतात. खाडीलकर व केळकर, गडकरी व देवल हे नाटककार त्यांनीं रंगविलेल्या नटांचे मागें छपूं शकत नाहींत. त्याप्रमाणें राजा राममोहनराय व इतर ब्राह्म पुढारी, श्रीमद्दयानंद, व लाला लजपतराय, श्रीदत्त व दत्तभक्त अशा मीं लिहिलेल्या पूर्वींच्या चरित्रांप्रमाणें याहि चरित्रांत माझी विचारसरणी ठिकठिकाणीं दिसून येईल. परंतु चरित्रनायकाच्या मनोरचनेचें व त्यांच्या विचारांचें वर्णन करितांना मी त्यांच्याच लेखकांतील उतारे मुद्दाम उद्धृत केले आहेत. तसेंच चरित्रांतील ज्या प्रसंगांचें वर्णन तत्कालीन प्रसिद्ध अगर अप्रसिद्ध लेखांतून आढळलें, तेंच अक्षरशः दिलें आहे. हें चरित्र प्रकाशकांनींहि काळजीपूर्वक तपासून पाहिलें आहे.

ह्या चरित्राचीं कांहीं प्रकरणें लिहून होत आहेत, इतक्यांत प्रकाशक श्री. नानासाहेब यांस नुकताच झालेला मुलगा श्रीकृष्ण निजधामास गेला ! हा एक या चरित्रास अपशकूनच झाला ! परंतु श्री. नानासाहेबांनीं तरीही हें चरित्र छापावयाचें असेंच ठरविलें. पुढें ह्याचीं दोनतीन प्रकरणें कंपोज झालीं नाहींत, तोंच दुर्दैवानें श्री. नानासाहेबांचे चुलते श्री. रामचंद्र कृष्ण ऊर्फ भाऊसाहेब पुराणिक हे कैलासवासी झाले ! हे दोन्हीहि दुर्धर प्रसंग अगदींच आकस्मिक आले ! परंतु राजास सुतक नसतें. त्याप्रमाणें थोर कार्यकर्त्या पुरुषांस खाजगी असें जीवन नसल्याप्रमाणेंच असतें. ह्यामुळें त्यांच्या

खाजगी जीवनांतील. आपात्ति त्यांच्या कार्यांत खंड पाडूं शकत नाहींत. हा विवेक लक्षांत आणून श्री. नानासाहेबांनीं माघार न घेतां आरंभिलेलें कार्य शेवटास न्यावयाचें असा निश्चय केला. हें त्यांस खरोखरीच भूषणास्पद आहे,

अशा रीतीनें अनेक दुर्लंघ्य अडचणींनां न जुमानतां हें आरंभिलेलें चरित्र पुरें होत आहे, ही श्रीसद्‌गुरूंचीच कृपा होय. ह्या चरित्रलेखनाचे कामीं ज्यांनीं ज्यांनीं थोडी फार माहिती देऊन सहाय्य केलें त्यांचे प्रकाशकांनीं आभार मानलेच आहेत. त्याशिवाय केरळ कोकिळ, भिषग्विलास, नवें मन्वंतर या मासिकांचा व श्री. गोविंद हरि फडके यांच्या यात्रावर्णनांचा मला चरित्रलेखनाचे कामीं विशेष उपयोग झाला, यास्तव त्या लेखकांचा मी ऋणी आहे. तसेंच या चरित्राच्या हस्त-लिखित प्रतीचा बराच भाग चरित्रनायकाचे मेव्हणे श्री. आत्मारामपंत खेर यांनीं मुद्दाम येथें येऊन वाचण्याची तसदी घेतली त्यांचाहि मी आभारी आहें.

अखेर ज्यांच्या कृपेनें हें चरित्रलेखन पुरें होत आहे त्या श्रीसद्‌गुरूंच्या चरणीं अशी नम्र प्रार्थना आहे कीं हें चरित्र प्रकाशकाचे व वाचकांचे संतोषास पात्र होवो!

**सदाशिव कृष्ण फडके.**

पनवेल, विजयादशमी शके १८५५.




**यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि ।**

[ आमचीं जीं चांगलीं आचरणें तीं त्वां ग्रहण करावीं, दुसरीं करूं नयेत. ]

नाटकें, कादंबऱ्या, चरित्रें, इतिहास इत्यादि प्रकारचें लिहिलेलें वाङ्मय मानवी व्यवहाराचें शब्दचित्र म्हणूनच तयार केलेलें असलें, सर्वांत व्यावहारिकच दृष्टि असली तरी त्यांतील हेतु अंशतः भिन्न असतात. नाटकें व कादंबऱ्या यांत मनोरंजन हाच मुख्य हेतु असतो. चरित्रें व इतिहास यांचा मुख्य हेतु मनोरंजन नसून थोर पुरुषांचें स्मारक व तद्द्वारां शिक्षण हा असतो. कादंबरीकार किंवा नाटककार आपल्या लेखनांत जसा स्वतंत्र असतो तसा चरित्रकार व इतिहासकार नसतो. जें जसें ज्या परिस्थितींत घडलें असेल तें तसेंच त्या परिस्थितीच्या वर्णनासह त्यास लिहावें लागतें. म्हणूनच शिरोभागीं लिहिलेल्या वचनाप्रमाणें सारग्रहणासंबंधीं शास्त्राची आज्ञा आहे.

कादंबरींत ज्याप्रमाणें विचित्र व विस्मयकारक प्रकार असतात, तसे चरित्रांतून क्वचितच आढळतात. तरी पण कादंबरीपेक्षां चरित्रच ज्यास्त बोधप्रद होतें. कारण यांतील वर्णन वस्तुस्थितीला धरून असतें. सत्यसृष्टींतील विषयकथन मानसशास्त्रदृष्ट्या अधिक परिणामकारक होतें. कविकल्पना आणि प्रत्यक्षानुसारी शास्त्रांचे प्रयोग यांत जें अंतर असतें, तेंच कादंबरी व चरित्र यांत असतें. काव्य आणि कादंबरी यांतील वर्णनें कितीहि चमत्कृतिजन्य असलीं तरी त्यांतून जो बोध घेतां येत नाहीं, तो चरित्रांतील साध्या गोष्टींपासूनहि घेतां येतो. चरित्रें हीं सूचक असतात. त्यावरून देश-काल-निमित्त यांची कल्पना होते. उलटपक्षीं चरित्र

12833 dt. 30.9.66 Rs. 2.50

म्हणजे देश, काल व कार्यकारणभाव या तीन रंगांत काढलेलें चित्र होय. चरित्राच्या रूपरेषेंत जी आकर्षक शक्ति असते, तीच त्या चरित्राच्या वरील तीन रंगांतहि असते. कविकल्पनेंतील भडक रंग जरी चरित्रांत न दिसले, तरी जे रंग दिसतात ते जास्त गंभीर असतात. चरित्रकाराचें कौशल्य रम्य कल्पनेंत नसून यथार्थ दर्शनांत असतें.

चरित्रनायकाच्या पूर्वपीठिकेपासून अखेरपर्यंत त्याच्या जीवनयात्रेंत वाचक हे तात्पुरते यात्रेकरूच बनतात. निदान मी माझ्या प्रिय वाचकांस तसे यात्रेकरू बनण्यास सांगत आहें. या यात्रेंत महत्त्वाच्या मुक्कामामुक्कामाला थांबून विचाराच्या चवाठ्यावर उभें राहून थोडें निरूपण करावें व मग पुढील पल्ला गांठावा; याप्रमाणें गमत रमत चलावें आणि या जीवनयात्रेंत वाचकांबरोबर आपणहि यात्रेकरू बनून पुण्यभागी व्हावें, अशी माझी योजना आहे. माझ्या चरित्रनायकाचा उपास्य ग्रंथ अध्यात्मरामायण हा होता. त्या ग्रंथांत पुराणकारांनीं मुद्दाम प्रसंग उत्पन्न करून अध्यात्मनिरूपण प्रत्येक अध्यायांत थोडें फार केलें आहे. अध्यात्मरामायण हा पारमार्थिक ग्रंथ आहे, हें एका उद्योगी पुरुषाचें व्यावहारिक चरित्र आहे. तरी पण त्याप्रमाणें या अल्पचरित्रांत ठिकठिकाणीं प्रसंगांची सूचना घेऊन मी निरनिराळ्या महत्त्वांचे विषय वाचकांचे समोर विचाराकरितां मांडीत जाणार आहें. ज्याप्रमाणें थोरांच्या घरच्या मिरवणुकींत नाक्यानाक्यावर चित्ताकर्षक दारुकाम लावतात, ज्याप्रमाणें पालखीची मिरवणूक वाटेंतील अनेक देवळांशीं थांबून तेथें आरती होते, त्याप्रमाणें या चरित्राच्या ओघांत प्रत्येक वळणावळणाचे ठिकाणीं थांबावें आणि तेथें सारासार विचारांचें लहानसें प्रेक्षणीय तीर्थक्षेत्र बनवावें, अशी माझी लेखनाकांक्षा आहे.

या माझ्या चरित्राच्या लेखनपद्धतींत अध्यात्माचा अप्रासंगिकपणा, संतचरित्रांचें विषयांतर, आणि वर्णनाचा पाल्हाळ अशा त्रिदोषांची चिकित्सा कोणी वाचकवैद्य करूं पहातील. वास्तव ह्या चरित्राची प्रकृतिच अशी, असें मी अगोदरच सुचवून ठेवीत आहें. सारासारविवेक, सद्गुरुभजन आणि आर्यसंस्कृतीचे प्रशस्त आदर्श हे विषम दोष नसून शारीरशास्त्रांतील सम धातु आहेत, असें समजावें. ‘ यद्यदाचरति श्रेष्ठः तत्तदेवतरेजनाः ’ । [ गीता ]

थोर पुरुषांचीं चरित्रें अनुकरणीय असतात, म्हणजे त्यांच्या जीवन-क्रमांतील प्रत्येक तपशिलवार गोष्ट अनुकरणीय असते असें नाहीं. सर भालचंद्र आडवें गंध लावीत आणि लोकमान्य उभें लावीत अथवा मालवीय आणि गोखले यांची उपरणें घेण्याची पद्धत वेगळी असे यांत महत्व तें काय? किंवा याहीपेक्षां विशेष गंभीरपणानें विचार करितां परशुराम, श्रीराम, श्रीकृष्ण आणि भगवान बुद्ध, शिवछत्रपति व पहिले बाजीराव, हेमाडपंत व नाना-फडणवीस, मेथा व रानडे ह्यांनीं अमुक वेळेला अमुक केलें म्हणून तेंच आज करून चालणार नाहीं व तसे लोक वागतहि नाहींत. 'स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनु वर्तते ।' ह्या चरणांत अनुकरणाचें रहस्य आहे.

बाह्याचरण अनुकरणीय असतेंच असें नव्हे तर त्या आचरणांत ज्या गूढ धर्मतत्त्वांचें पालन होत असतें, अथवा जीं थोर पुरुषांचे आचरणाला खरीं प्रेरक असतात, तीं धर्मतत्त्वेंच चिंतनीय व मननीय असतात. गंध लावणें अथवा उपरणीं घेणें यांत आपल्या चालीरीतींबद्दल व संस्कृतीबद्दल जो आदर दिसतो, तो अनुकरणीय आहे. अर्थात चरित्राचे लेखकानें व वाचकानें कोणत्याहि थोर पुरुषाचे चरित्रांत मानवी जीवनरहस्य कोणतें प्रगट होतें इकडेच अवधान ठेवलें पाहिजे. चरित्रांतील प्रसंग व वर्तन हीं ज्या मानवी-जीवनरहस्याचीं सूचक चिन्हें असतात तें रहस्यच विस्तारपूर्वक वर्णनीय आणि अगत्यपूर्वक चिंतनीय असतें. ही दृष्टि या चरित्रांत ठेवली आहे. माझ्या सर्व चरित्रांतून हीच विवेचक दृष्टि ठेवण्याचा प्रयत्न आहे. सनातनी आर्यसंस्कृतीला धरून असलेली कुटुंबव्यवस्था, सदाचार, उद्योग, उपासना, अभ्युदय आणि अंतिम ध्येय यांचेंच सविस्तर वर्णन या ग्रंथांत प्रसंगानुसार केलें आहे.

चित्राचे मागें चित्रकार छाया आणि प्रकाश यांचा पृष्ठभाग दाखवितो, किंवा एखादा सुसंगत देखावा दाखवितो, अशा प्रकारच्या पृष्ठभाभागावांचून त्या चित्राची खुलावट होत नाहीं. एखादा धोरणी फलज्योतिषी ज्यावेळीं एखाद्या चरित्राचें भविष्य वर्तवितो त्यावेळीं त्यास त्या व्यक्तीपुरतीं ग्रहांचीं फलें अजमावतांना देश-काल-

परिस्थिती हीं लक्ष्यांत घ्यावीं लागतात. देश-काल-परिस्थितीच जर अत्यंत अपकर्षाची असेल तर व्यक्तीच्या ग्रहांचा परिणाम त्या मानानें कमीच अनुमानावा लागतो. भडभुंजाची टिपरी मूठभर दाण्यांनींच कशी भरते, हें समजण्यास त्या टिपरीला फारशी खोली नसून ती लांकडानींच बहुतेक भरलेली असते, हें दाखवावें लागतें. याप्रमाणें कोणाहि व्यक्तीचें चरित्रवर्णन करतांना तत्कालीन देश-परिस्थिती सांगावीच लागते.तसेंच कालाच्या अनुकूलतेचा चरित्रनायकानें कसा फायदा घेतला किंवा प्रतिकूल कालाला त्यानें कसें तोंड दिलें, हें सांगणें आवश्यक असतें. परिस्थितीचे दास होणें व आपल्याला पाहिजे तशी परिस्थिति उत्पन्न करणें हेंच सामान्य आणि असामान्य पुरुषाचें लक्षण होय. यास्तव पुढील चरित्रांतील अनेकमुद्यांचें महत्त्व लक्षांत येण्यासाठीं आरंभीं इतिहासाचें संक्षिप्त पर्यालोचन व समकालीन स्थानिक व राष्ट्रीय परिस्थिती यांचें वर्णन करणें भाग झालें आहे.

शिवाय भागवतांतील अवधूतांच्या चोवीस गुरूंच्या कथेवरून किंवा पंचतंत्रांतील गोष्टींवरून एक गोष्ट उघड होतें कीं, सामान्य वाटणाऱ्या गोष्टींपासूनहि सूज्ञांस पुष्कळ बोध घेतां येतो. अधिकांतअधिक बोधप्रद होणें हा चरित्रांतील एक विशिष्ट हेतु असतो. अशा ह्या बोधसन्मणिमालेंत मधून मधून चरित्राचा धागा दिसेनासा झाला, तरी त्यामुळें तो धागा तुटला असें कोणी समजत नाहींत व त्यामुळें रसहानि होते असें कोणी मानीत नाहींत. कारण चरित्र हा चिंतनाचा विषय आहे, रंजनाचा नव्हे.

चरित्रासंबंधीं आणखी एक महत्त्वाचा मुद्दा येथें सांगणें जरूर आहे. तो असा कीं, संत-चरित्रें आणि व्यावहारिक पुरुषांचीं चरित्रें, यांत बरेंच अंतर असतें. आतां हें खरें कीं,जे संत चरित्राचा विषय होतात, त्यांच्या हातून बहुधा व्यावहारिक पुढाऱ्यांप्रमाणें लोकसंग्रहादि कार्येंहि अनेक झालेलीं असतात. तसेच व्यावहारिक पुरुष चरित्रविषय बनतात त्यांच्या चरित्रांत संतांच्या लक्षणांपैकीं कित्येक थोर गुण आढळतात. अशा रीतीनें उभय चरित्रांत जरी कांहीं साम्य असलें, तरी उद्योगी पुरुषाचें व्यावहारिक चरित्र प्रवृत्तिप्रधान असतें, त्या चरित्रांत अभ्युदयाची आकांक्षा, शास्त्रवासना, कर्तव्याची जाणीव हे सर्व गुण असतात. ते संतचरित्रांत असत नाहींत. व्यावहारिकांचा कर्मयोग आणि

संतांचा ज्ञानयोग किंवा भक्तियोग यांत तत्त्वतः बरेंच अंतर आहे. व्यावहारिकांचा सदाचार आणि सद्विचार व संतांचा सदाचार व सद्विचार यांत बाह्यतः फार अंतर आहे. ' कांहीं न करणें हीच तुझी सेवा' ही संतांची सेवा आणि ' माझा देश माझा गांव, माझा वाडा माझा ठाव । ऐसी मनीं धरी हांव । तो रजोगुण '॥ [ २।५।१५ दा. बो. ] अशा रजोगुणी पुरुषांची लोकसेवा यांत अंतर असतें. तरी रहस्याचे दृष्टीनें संतांचा सदाचार व सद्विचार व्यावहारिक सुज्ञांसहि चिंतनीय आहे.

भिन्नप्रकृतीचे लोकांस ज्ञानयोग, राजयोग, भक्तियोग, व कर्मयोग असे निरनिराळे मार्ग शास्त्रानें सांगितले आहेत. इतकेंच नव्हे तर एका कर्ममार्गांतहि गुणपरत्वें दृष्टिभेद दिसून येतो. कर्ममार्गांचें अनासक्ति हें एकच तत्त्व असलें तरी गुणभेदानें तेंच तत्त्व अमलांत आणण्याचे प्रकार भिन्न ठरतात. सात्त्विक मनुष्य आपल्या नम्र भावानें कर्तव्याच्या बंधनांत सहज सांपडतो. त्याच्याजवळ असें बोलावें लागतें कीं, वाटल्यास कर्म करणें हा आपला हक्क आहे. आपण कोणत्याहि कर्तव्याचे कांहीं बांधलेले नाहीं. आपण ईश्वराचेच स्वतंत्र अंश आहोंत. कर्तव्याच्या व्यर्थ वेणा देत बसणें हा कांहीं पुरुषार्थ नव्हे. बंधन—मग तें स्वकर्तव्य म्हणून कां असेना—तें जाचकच आहे. तें लाजिरवाणेंच आहे. जो रजोगुणी असतो, तो एषणांचे उंबरे झिजवीत असतो, कर्तव्यावांचून त्याला चैनच पडत नाहीं. अगोदर लग्न करावें आणि मग स्त्रीपुत्रांचें कोड पुरविण्याचें कर्तव्य मिरवावें; अगोदर मी ब्राह्मण हा अभिमान धरावा आणि मग ब्राह्मण जातीच्या उन्नतीकरितां जीवापाड मेहनत करणें हें कर्तव्य मानावें; मी भोगी व हें जग भोग्य असा मोह धरावा आणि मग रसिकतेनें विषयसेवन करणें हाच पुरुषार्थ मानावा; मी बुद्धिमान्, मी कर्तृत्ववान्, अनेकांचा हितकर्ता, अशा अभिनिवेशानें लोकसंग्रहाचे कर्तव्यास झटून पडावें; अशी त्याची विचारसरणी असते. त्याचा परार्थ हाहि एक प्रकारचा स्वार्थच असतो आणि त्या स्वार्थाचा किंकर होऊन तो कर्म करीत असतो. हें तत्त्वतः भूषण नसून ही लाचारी आहे. ही बेडी सोन्याची असली तरी ती गुलामगिरीच आहे. त्याच्या कर्मयोगाच्या बुडाशीं अहंता आणि ममता हे मोठेच अज्ञानजन्य दोष असतात. वास्तव त्यास

त्याची क्षुद्रता व ईश्वराचें सामर्थ्य हीं दोन्ही दाखवून हतगर्व करून खची करावें लागतें. पंडुरोग्याचे तीव्र क्षुधेला रोग म्हणतात व आपल्या क्षुधेला प्रकृति स्वभाव असें आपण म्हणतों. त्याप्रमाणें रजोगुणी पुरुषाची कर्तव्यबुद्धि हा एक स्वभावच बनतो. पण निरोगी माणसाची क्षुधा हा सुद्धां देहात्मबुद्धीचा एक उपजत रोगच आहे. त्याप्रमाणें रजोगुणी माणसानें सुद्धां आपल्या कर्तव्यासंबंधीं जाणावें. स्वामी विवेकानंद मरणापूर्वी पांच सहा दिवसच अगोदर म्हणाले कीं, कर्तव्यबुद्धि हें माझ्या स्वभावांतील एक वैगुण्य आहे. कर्तव्य संपलें ही कल्पनाच मला असह्य वाटते. याच्या अगदीं उलट तमोगुणी पुरुषाची स्थिति असते. तमोगुणी पुरुष म्हणजे आळशी, बयादखोर, व अडाणी असतो. अशा माणसाच्या हातीं वेदान्तांतील मायावाद हें एक मोठेंच आत्मघातकी हत्यार बनतें! अशा माणसांच्या पाठीमागें हेयबुद्धीनें कां होईना, एषणांचे तृप्त्यर्थ कां असेना, कर्तव्याची टोंचणी अखंडित ठेवावी लागते. विशेषतः अशाच वृत्तीच्या लोकांना काम आणि अर्थ हे पुरुषार्थ सर्वांत श्रेष्ठ आहेत, असें शास्त्र सांगतें. व धर्माच्या अनुमतीनें काम आणि अर्थ हे पुरुषार्थ सिद्ध करणें हेंच त्यांचें योग्य ध्येय ठरतें. तात्पर्य, लोकसेवा हें एकच कर्म सत्त्व–रज–तम–गुणी पुरुषांनीं भिन्न दृष्टीनें करावें, अशी शास्त्राची अपेक्षा असते–जनताजनार्दनाचीं पादत्राणें हृदयाशीं घेणें हा माझा हक्क आहे, हें सत्वस्थ भाविकांचें ब्रीद असावें. मी लोकसंग्रह परोपकारबुद्धीनें नव्हे तर जनताजनार्दनाचा सेवक या निरहं-बुद्धीनें बिनबोभाट करीन, लोकाग्रणी म्हणून मिरविण्याकरितां नव्हे, अशी रजोगुणी पुरुषाची भावना असावी, आणि लोकांच्या संकटांत उडी घालून त्यांस संकटमुक्त करीनच करीन असा कर्तव्याच्या अभिमानाचा तामसी पुरुषाचा करारी बाणा असावा. हे कर्ममार्गांतले भिन्न निर्देश ज्याचे त्याला होत. एकान दुसऱ्याचा अवलंब करणें अधःपातास कारण होईल[1].

सृष्टिच त्रिगुणात्मक आहे यामुळें सारीं चरित्रें त्रिगुणात्मकच असणार हें उघड आहे, तथापि त्यांत कोणत्या तरी एका गुणाचें आधिक्य असतेंच. त्याप्रमाणें पुढील चरित्र रजोगुणप्रधान आहे असें समजावें.

---

१ माझें मनोबोध आणि नवामनु पृ. ८४ ते ९६ पहा.

प्रत्येक ग्रंथाचें स्वरूप काय त्याचें प्रयोजन काय ? तो कोणत्या दृष्टीनें कोणासाठीं लिहिला आहे व त्याची फलश्रुति काय अपेक्षित आहे, या गोष्टी लक्षांत घेऊनच ग्रंथ वाचावा लागतो. नाहीं तर ग्रंथासंबंधीं गैरसमज उत्पन्न होतात व त्याचा व्हावा तो उपयोग होत नाहीं. वर दिलेल्या लक्षणांचा हा एक चरित्र ग्रंथ आहे हेंच याचें स्वरूप, तन-मन-धन यांचें संगोपन कसें करावें, धर्म-अर्थ-काम हे त्रिविध पुरुषार्थ कसे संपादन करावे, जेणेंकरून निवृत्तिलक्षण परमार्थास साधक अंतरणार नाहीं, अशा रीतीनें प्रवृत्तिलक्षण व्यवहारांत कोणतें धोरण असावें इत्यादि मुद्यांसंबंधीं विचार-विनिमय करणें, हें या ग्रंथाचें प्रयोजन आहे. प्रौढ विद्यार्थी या ग्रंथाचा अधिकारी आहे. विचारजागृति ही या चरित्रग्रंथाची अपेक्षित फलश्रुति आहे.

**जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळ दळें नेणती ।**
**तैसी परी आहे सेविती । ग्रंथीं इये ॥ १।५९** ज्ञानेश्वरी.



॥ श्रीसमर्थ ॥

# कै० विष्णु कृष्णशास्त्री पुराणिक यांचें चरित्र.



## प्रकरण १ लें

### उत्कर्षापकर्ष.

तानि तानि कमलानि तज्जलं तानि षट्पदकुलानि ते खगाः।
सर्वमेकसमये तु विच्युतं पंकशेषमचिरादभूत्सरः ॥ १ ॥

सुभाषित.

वरील सुभाषितांत कवीनें गतवैभवाचें लाक्षणिक वर्णन केलें आहे. माझे चरित्रनायकाची कार्यभूमि ज्या एका विस्तीर्ण तलावाचे काठीं आहे, त्या पनवेलच्या वडाळें तळ्यासहि वरील सुभाषित लागू पडतें. जेथें एक वेळ कमलांतील केसरांचाच आहार करणारे विहंगम होते, तेथें आतां चिखलांत कचराहि मिळत नाहीं. जेथें विलासिनी स्त्रियांच्या जलक्रीडेंत तुटलेल्या कंञ्यांतील मोतीं वेंचून

घेण्याची मोतीचूर खाणारे हंसहि परवा करीत नव्हते, तेथें कोरड्या झालेल्या चिखलांत तोंडें खुपसणाऱ्या बक आणि बेडुक यांची आज उपासमार होत आहे. असा वरील श्लोकाचा भावार्थ आहे.

वैभव आणि सौंदर्य हीं अशाश्वत तर खरींच, आणि कधीं कधीं तर यांचा अभावहि भूषणावह होतो, हेंहि कांहीं खोटें नाहीं. रसहानि हाहि भगवल्लीलेंतील एक विनोद आहे ! श्रीमंताला त्यागानें दारिद्र्य आलें तरी तें शोभाच देतें. पण आलस्य आणि अनास्था यांनीं आलेलें दारिद्र्य दूषण ठरतें. शृंगारादि रसांत सुद्धां हीच मौज आहे. रतिक्रीडेनंतर आलेली ग्लानि आणि क्षयानें आलेली ग्लानि सारखीच कशी ठरेल ! समरांगणांत वीराचे मस्तकीं पडलेले घाय, आणि गळवा-खांडकांनीं विदीर्ण झालेली कायेची रया यांत केवढें अंतर ! करुणाष्टकांच्या करुणरसानें आलेली दीनता आणि विषयलालसेची लाचारी यांत साम्य कोठचें ! तपानें व तितिक्षेनें जीर्ण झालेलं शरीर आणि निरुपायाच्या उपासमारीनें प्रेतकळा आलेलें शरीर, कृशतेंत सारखेंच असलें, तरी एकाची योग्यता दुसऱ्याला येणार नाहीं. आम्ही गतवैभव झालों, हें दूषण नाहीं, आम्ही कशानें आणि कशासाठीं गतवैभव झालों, हा विचार लज्जास्पद झाला आहे ! आपण आर्यसंस्कृतीपासून च्युत होण्याच्या मार्गांत आहोंत, हीच अत्यंत खेदाची गोष्ट आहे ! आपल्या आर्यसंस्कृतीला आसुरी संपत्तीचा मोह नाहीं. पण त्याचबरोबर अज्ञान, आलस्य, आणि नादानपणा हाहि तिला खपणार नाहीं !

धर्माला अनुकूल जो काम तो मी असें भगवंतांनीं गीतेंतील विभूतियोगांत स्पष्ट सांगितलें आहे.

**धर्मार्थावुच्यते श्रेयः कामार्थौ धर्म एवच ।**
**अर्थ एवेह वा श्रेयस्त्रिवर्ग इति तु स्थितिः ॥**

मनु. २।२२४

भावार्थ—कांहीं आचार्य धर्म व अर्थ हे दोन कामाचे हेतु असल्यामुळें श्रेष्ठ आहेत असें म्हणतात. कोणी काम व अर्थ ( हींच सुखसाधनें असल्यामुळें ) श्रेष्ठ आहेत असें समजतात. कोणी धर्म हेंच सर्व सुखाचें मूळ असल्यामुळें त्यास श्रेयस्कर मानतात. कोणी नुसत्या अर्थासच श्रेष्ठत्व देतात. पण धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गांचेंहि समपक्षपातानें सेवन केल्यास ते तिन्ही श्रेयस्कर होतात व हीच खरी स्थिति आहे, असें मनु म्हणतो.

तात्पर्य—प्रत्येक व्यक्ति उत्कर्ष आणि अपकर्ष या नागमोडी रस्त्यानें हें संसारचक्र आक्रमीत असतां, त्याची प्रवृत्ति आणि निवृत्ति हीं दोन शकलें त्यास दिसतात. त्यांपैकीं प्रवृत्तिमार्गांत काम आणि अर्थ हे दोन गतिप्रेरक पुरुषार्थच आहेत. काम आणि अर्थ ह्या दोन तेज़ी घोड्यांच्या गाडींत बसूनच हा प्रवासी प्रवृत्तिमार्गानें चालला आहे. हे उमदे घोडे बेफ़ाम होऊं नयेत, म्हणून धर्म.या सारथ्याची योजना आहे. धर्माच्या नियंत्रणांत प्रवृत्ति सुरूं असतां पुढें निवृत्तीचा मार्ग सुलभ व सुखावह होतो. उलट धर्माचें नियंत्रण सुटलें असतां प्रवृत्तिमार्गांत अपघात होतात! व तो अपकर्षाचा काळ अकीर्तीस कारण होतो. रस्त्यांत खळगा असल्यामुळें गाडीला अचका बसणें वेगळें व गाडी हांकणाराचे अनवधानानें गाडी खड्यांत जाणें वेगळें. रस्त्याला नागमोडी वळणें असणें वेगळें, आणि हांकणारानें निशा केल्यामुळें घोडे बेफ़ाम होऊन त्यांनीं गाडी मार्गेंच रेटीत नेणें किंवा रस्त्याच्या बाजूला गटारांत घालणें वेगळें. अर्थ आणि काम या पुरुषार्थांच्या जोडीवांचून संसाराची गाडी प्रवृत्ति मार्गावरून नीटपणें चालणें शक्य नाहीं. तसेंच प्रवृत्तीचा मार्ग सद्धर्मानें आक्रमिल्यावांचून सामान्य जनांस निवृत्तिमार्ग लागणेंहि कठीणच आहे व निवृत्तीवांचून मोक्ष नाहीं. या गोष्टी लक्षांत घेऊन

तनु-मन-धन यांच्या स्वास्थ्याचा व निर्दोषित्वाचा विचार अगत्य व्हावयास पाहिजे. व्यक्तीप्रमाणें राष्ट्राचींहि तनु-मन-धन हीं तीन प्रधान अंगें असतातच. तीं ईश्वरार्पण होण्यापूर्वीं तीं निर्दुष्ट आणि निरोगी राखणें अगत्याचें आहे. यास्तव या व्यावहारिक चरित्र ग्रंथांत विशेषेंकरून तोच विचार कर्तव्य आहे. आणि अनासक्तिपूर्वक सदुद्योग ही या चरित्राची भूमिका या प्रकरणांत दर्शवीत आहे.

स्वास्थ्य आणि रक्षण हे जसे वैद्यशास्त्राचे दोन हेतु, त्याचप्रमाणें योग आणि क्षेम हे व्यवहारशास्त्राचे हेतु दिसतात. आयुर्वेदाचा विषय शरीर व अर्थशास्त्राचा विषय संपत्ति या दोहोंची तुलना करितां असें दिसून येतें कीं, संपत्तीला कधीं कोणी शरिराची उपमा देत नाहींत, शरिराला संपत्तीची उपमा देऊन शरीर ही संपत्ति आहे असें म्हणतात. याप्रमाणें उपमान म्हणून संपत्तीचें श्रेष्ठत्व मानावें तर उलट 'शीर सलामत् तर पगडी पचास' अशी अन्वर्थक म्हण आहे. पुन्हां-

**धन्य धन्य हा नर देहो। याची अपूर्वता पहा हो।**
**जो जो कीजे परमार्थ लाहो। तो तो पावे सिद्धीतें ॥ १ ॥**

अशी नरदेहाची विशेष स्तुति करणारे श्रीसमर्थ रामदास

**प्रपंचीं पाहिजे सुवर्ण। परमार्थीं पंचीकरण।**

असें संपत्तीचेंहि महत्त्व वर्णन करितात. शरिरासंबंधीं आरोग्याचें जसें सोंग आणतां येत नाहीं, तसें प्रपंचांत श्रीमंतीचेंहि सोंग आणतां येत नाहीं. सारांश, स्वास्थ्याला आरोग्याप्रमाणेंच धनाचीहि गरज असते. व्यक्ति असो अगर राष्ट्र असो, त्याला संपत्तीच्या बळावरच महत्त्व प्राप्त होतें, असा जगाचा अनुभव आहे.

म्हटलें आहे कीं,—

वयोवृद्ध, तपोवृद्ध, ज्ञानवृद्ध व इतरहि गुणिजन, धनवृद्धांच्या

आंगणांमध्यें सेवकांप्रमाणें उभे राहतात. ज्या वेळीं पुरुष निर्धन होतो, त्या वेळीं त्याचीं मान, अभिमान, विज्ञान, विलास आणि उत्कृष्ट बुद्धि हीं सर्व बरोबरच नाश पावतात. या सुभाषितांत थोडी अतिशयोक्ति असली, तरी व्यवहारतः सत्यहि बरेंच आहे. आपण व्यवहारांत असें पाहातों कीं, निश्रेयसाशीं स्पर्धा करण्याची ताकद एका अभ्युदयाला मात्र आहे. आपल्या निवृत्तिप्रधान हिंदुधर्मांत अभ्युदयापेक्षां निश्रेयसाचें, हिंसेपेक्षां अहिंसेचें, बळापेक्षां शांतीचें, आणि भोगापेक्षां त्यागाचें माहात्म्य अधिक सांगितलें आहे, हें खरें; परंतु अभ्युदय ज्यांच्या पाठीस लागला आहे, तोच नचिकेता निश्रेयसाचा अधिकारी खरा! भीष्मालाच शस्त्रसंन्यास शोभला! भीमानें शांति धरली हेंच नवल! निःशक्ताची शांति ती काय! त्याचप्रमाणें व्यवहारांत त्यागालाहि संपन्नतेची गरज असते.

महाभारतांत एका दुष्काळपीडित कुटुंबाची कथा आहे. अनेक दिवस अन्न न मिळाल्यामुळें अगदीं मरणाच्या द्वारीं बसलेल्या त्या कुटुंबास कर्मवशात् थोडें अन्न मिळालें. तें अन्न ते खाणार तों, तेथें एक क्षुधित अतिथि आला व त्यानें अन्नाची याचना केली. तेव्हां गृहस्थधर्माप्रमाणें अतिथीला विन्मुख जाऊं द्यावयाचा नाहीं, यासाठीं त्या धर्मशील कुटुंबांतील नवराबायको व मुलगा अशा माणसांपैकीं प्रत्येक जण अन्नाचा आपला हिस्सा अतिथीला देऊन आपण अगोदर मरण्यास तयार झाला. याप्रमाणें, त्या मरणोन्मुख कुटुंबांतील एकाच्या तोंडचा घांस त्या अतिथीनें खाल्ला! पण त्या थोड्याशा अन्नानें त्याची भूक जास्तच चाळविली! व तो आणखी अन्न मागूं लागला! शेवटीं त्या अन्नान्नगत झालेल्या कुटुंबाच्या अगदीं

(१) वयोवृद्धस्तपोवृद्धा ज्ञानवृद्धास्तथापरे। तिष्ठन्ति सधनद्वारे गुणिनः किंकरा इव ॥
(२) मानो वा दर्पो वा विज्ञानं विभ्रमः सुबुद्धिर्वा। सर्वं प्रणश्यति समं वित्तविहीनो यदा पुरुषः॥

तोंडाशीं आलेलें सारें अन्न त्यांनीं आतिथ्य हा परमधर्म म्हणून संतोषानें त्या अतिथीला दिलें व सारीं मरणास तयार झालीं ! ही त्यागाची परमावधि म्हणून महाभारतांत वर्णिली आहे. पण येथेंहि ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, ज्या वेळीं अन्न अत्यंत दुर्मिळ होतें, त्यावेळीं तें कुटुंब कांहीं काल अन्नानें किंचित् संपन्न झालें, तेव्हांच त्यास त्याग करितां आला. त्यागानेंच त्यांना अमृतत्व प्राप्त झालें हें खरें; पण त्या त्यागाला अगोदर विषयप्राप्ति, तितिक्षा सहन करणारें शरीर व संयम प्राप्त झालेलें मन, अशा त्रिवर्गाची गरज लागलीच.

दुसरी गोष्ट अशी कीं, या कुटुंबांतील प्रत्येकानें दोन चार घांस अन्न देऊन त्यागीपणांत फारच वरचा दर्जा मिळविला, हें त्यांच्या परिस्थितीच्या दृष्टीनें जरी योग्यच असलें, तरी गरीब जनतेचें स्वास्थ्य व रक्षण या दृष्टीनें विचार करितां त्यागाला संपन्नतेच्या आधिक्याची जास्त गरज आहे.[1] गृहस्थाश्रमांत सुद्धां तपस्व्याच्या तपाप्रमाणें गृहस्थाची संपत्ति ही त्याची शक्ति आहे. आणि समाजधारणेला तर या शक्तीची अत्यंत गरज आहे. प्राण हा अन्नमय आहे. औषधिमय नाहीं. त्याचप्रमाणें जेथें गृहलक्ष्मी सुखानें नांदत आहे तेंच घर. नाहीं पेक्षां घर आणि रान यांत अंतर काय ? ज्यांनीं क्षुधाच बंद होते, अशा वनस्पति गिरिकंदरीं असतील, पण त्यांच्या योगानें घरोघरच्या चुली विझवितां येत नाहींत. शाब्दिक तत्त्वज्ञानानें क्षुधाशांति होणें शक्य असतें तर घरोघर ही पाकसिद्धीची खटाटोप कशाला होती ? क्षुधेची अपरोक्षता ब्रह्माच्या परोक्ष ज्ञानानें दूर होत नाहीं. क्षुधेची पीडा होणाऱ्या शरिरापासून जोंपर्यंत आपल्याला अलग होतां येत नाहीं, तोंपर्यंत क्षुधा निवारण्याचे उद्योग केलेच पाहिजेत, हें उघड आहे, वेदान्तहि प्रापंचिकाला याहून कांहीं वेगळें सांगत नाहीं.

" **कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् ।** "

---

(१) धर्मश्चार्थेन महता शक्यो राजन्निषेवितुम् ॥ ३।३३।४८ म.भा.

" कुशलांत प्रमाद करूं नकोस. ऐश्वर्य मिळविण्यांत प्रमाद करूं नकोस." अशाच देहबुद्धीच्या प्रापंचिकास शास्त्राच्या आज्ञा आहेत. सारांश, अन्न हेंच ज्याचें उपलक्षण त्या संपत्तीची देहगेहात्मक प्रपंचाला फार गरज आहे. गृहस्थाला द्रव्याची फार गरज आहे, ही गोष्ट अगदीं प्राचीन काळच्या याज्ञवल्क्यापासून उघड दिसत आहे. याज्ञवल्क्यांनीं आश्रमांतर करीपर्यंत ते आर्थिक दृष्ट्या संपन्न असावेत असेंच दिसतें. तत्त्वज्ञानावरील वादविवादांतहि त्यांनीं सहस्रावधि गाई व सोनेंच मिळविलें. अर्थ संपादन करणें हा एक पुरुषार्थ आहे. ईश्वराच्या कृपेच्या मदतीनें अर्थ संपादन करणारे अर्थार्थि हेहि माझे भक्त होत, असेंच भगवान् गीतेंत म्हणतात.

अर्थ संपादन करण्याचें विशेष साधन म्हणजे व्यापार होय. शेती आणि व्यापार हेंच फक्त पूर्वींचे द्रव्यार्जनाचे मार्ग दिसतात. त्यांतहि शेतीपेक्षां व्यापार हेंच द्रव्यार्जनाचें मुख्य साधन होय. आज जगांत सर्वांत व्यापारालाच महत्त्व जास्त प्राप्त झालें आहे. पूर्वीं एक काळ असा होता कीं, त्या वेळीं हिंदुस्थानचा व्यापार साऱ्या जगभर सुरू होता. आणि हिंदुस्थान हा एकच देश जगाच्या पाठीवर कांहीं काळ असा होता कीं ज्यास सुवर्णभूमि हें नांव असून तें नांव या देशास सार्थकपणें शोभत असे.

पण, ही जशी सुवर्णभूमि होती, तशीच ही त्यागभूमिहि होती. येथें रघुराजासारखे लोकोत्तर पुरुष विश्वजित् यज्ञ करीत, व दानाचे पूर्ततेसाठीं हानांचा पाऊसहि पाडीत ! आतिथ्य व अनासक्ति हे गृहस्थाश्रमाचे सर्वांत श्रेष्ठ धर्म आपल्या धर्मशास्त्रानें मानलेले आहेत. ज्यांच्या गोत्रांत माझे चरित्रनायक जन्मास आले, त्या अत्रिऋषींच्या अनसूयेची कथा ही आतिथ्यधर्माची परिसीमा होय. हिंदुस्थानच्या या आतिथ्यधर्मामुळेंच अथवा अनासक्तीमुळेंच ग्रीक, हूण, तार्तर, मोंगल,

पठाण, फ्रेंच, डच, पोर्तुगीज, इंग्रज, अशा किती तरी परद्वीपस्थांना आर्यावर्तातील पाहुणचाराचा लाभ घडला आहे. ह्या पाहुण्यांपैकीं कांहींनीं 'भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी' ह्या म्हणीप्रमाणें त्या आतिथ्याचा व अनासक्तीचा गैरफायदाहि घेतला. आणि त्यामुळेंच शिरोभागीं लिहिलेल्या सुभाषिताप्रमाणें या देशाची आज हतभाग्य स्थिति झाली, असें कोणी कोणी समजतात, पण मिठाच्या खड्यानें दूध नासलें, हा कांहीं दुधाचा दोष नव्हे.

तार्तर, मोंगल, पठाण यांनीं हिंदुस्थानची मनमुराद लूट केली व हिंदुमुसलमान हें कायमचें द्वैत येथें ठेवलें ! पोर्चुगीज, डच, फ्रेंच, इंग्रज वगैरे युरोपांतील परकीय लोक येथें प्रथम व्यापाराकरितां आले व त्यांनीं आपला सर्व व्यापार हिरावून घेतला. तो इतका कीं आतां लक्षावधि प्रजाजनांच्या हातापायांच्या नाड्यांचा व्यापारहि बंद पडण्याची वेळ आली आहे ! ही गोष्ट खरी. पोर्चुगीज लोकांनीं आमचा व्यापार घेतला व फिरंगी रोगासह आम्हांला बाप्तिस्मा दिला ! आमचें पाणी भ्रष्ट केलें. इंग्रजांनीं आमचा व्यापार व स्वातंत्र्य हिरावून घेतलें आणि मिल्ल व स्पेन्सर यांचें पाखंड आमच्या पदरांत टाकलें ! आणि तेजोहीनतेची प्रेतवत् शान्ति आम्हांला दिली ! आमची ही मूळची सुवर्णभूमि असतां आमच्या धर्मभोळया आतिथ्यानें,-वेदान्तीअनासक्तीनें आमची दुर्दशा केली,असें कोणी म्हणतात.पण असें म्हणणें योग्य नव्हे. आतिथ्य आणि अनासक्ति अथवा त्याग हे निरपवाद सुखकारी होण्यास त्यांत ईश्वरार्पण बुद्धि पाहिजे. किंवा तसें शक्य नसेल त्यावेळीं आपण आपल्या स्वत्वाबद्दल तरी पुरें सावध असलें पाहिजे. त्यागानें आत्मशुद्धि करावी व आतिथ्यानें भगवद्भाव वाढवावा, असा हा वैयक्तिक धर्म आहे. आतिथ्य म्हणजे बावळटपणा किंवा भोळसटपणा नव्हे. आणि त्याग म्हणजे अविचाराची दिवाळखोरी नव्हे.

वस्तुतः आतिथ्य आणि त्याग याला सीमा नाहीं. यास नचिकेत, ध्रुव, प्रल्हाद, एकलव्य, हरिश्चंद्र, रघु, श्रीयाळ, दधीचि, मयूरध्वज, गौतम-बुद्ध, कबीर, दामाजीपंत अशीं आर्य संस्कृतींतील अनेक उदाहरणें देतां येतील. त्यागानें मनुष्य दरिद्रि होत नाहीं, उलट त्याचें ऐश्वर्य वाढतें. आतिथ्यानें त्याला कमीपणा येत नाहीं. त्याचा आत्मौपम्यभाव पुष्ट होतो. पण या त्यागांतील ईश्वरार्पणाची भावना विसरतां कामा नये. तसेंच त्यागांत शास्त्रानें अनुक्रम सांगितला आहे तो फार महत्त्वाचा आहे. अगोदर अशास्त्रीय कर्मांचा व भोगांचा त्याग करावा आणि मग शास्त्रीय कर्मांचा व भोगांचा त्याग करावा. अर्थात् ज्या काळीं जीं आमचीं प्रवाहपतित कर्तव्यें आहेत, व जे भोग धर्म्य आहेत, त्यांचा त्याग करून ज्या काळीं जें कर्म अशास्त्रीय व जे भोग निंद्य आहेत, त्यांचा मोह धरणें हा अनाचार अपकर्षास कारण होतो. आपलें धर्मशास्त्र अपकर्षास कारण नाहीं. तसें जे मानतात त्यांस शास्त्ररहस्य समजलेलें नसतें.

वास्तविक स्थिति अशी दिसते कीं, आपल्याला आर्यसंस्कृतीनें तेज-हीन केलें नाहीं, तर परकीय सत्तांनीं व संस्कारांनीं आपल्याला नादान केलें आहे. आपलें सत्वहरण करण्याकरितां आलेल्या कपटी देवांचेंहि अनसूयेनें स्वागतच केलें. पण अनसूयेनें त्या कपटी अतिथींबद्दल ज्याप्र-माणें असूया दर्शविली नाहीं, त्याचप्रमाणें ती मोहवश होऊन त्यांच्या कपटाच्या आहारींहि गेली नाहीं. उलट तिनें आपल्या तेजानें त्या थोरल्या देवांना लहानांपेक्षां लहान केलें. हाच स्वत्वाचा विजय होय. पण आपण मात्र परकीय संस्कृतीला हुरळून गेलों आणि परकीयांच्या शस्त्रसामर्थ्या-पेक्षां संस्कृतिविजयानें नादान झालों. परकीय संस्कृतीचें आतिथ्य-स्वागत-स्वत्व न गमावितां केलें पाहिजे हा विवेक राहिला नाहीं. यामुळेंच बंगाल आणि पंजाब बराच विधर्मी झाला. त्याग स्वधर्माचा सांगितला नाहीं, ही साधी गोष्टहि ते विसरले. स्वत्वाला ते जागले

नाहींत. अल्प मोहासाठीं त्यांनीं आपली संस्कृति गमावली ! आपल्या मुली परकीयांना देऊन त्यांनीं हितशत्रु जोडले.

प्रारब्धवशात कांहीं काल अयोध्येचें राज्य अंतरलें, त्याचें रामास वाईट वाटलें नाहीं. पण रावणानें सीतेला चोरून नेलें, हें त्यास अत्यंत नामुष्कीचें झालें. त्याचप्रमाणें जगाच्या स्थित्यंतरांत अभ्युदय हातचा गेला तर तो येईल. पण आमची संस्कृति—आमचें स्वत्वच गेलें, मग कोणी कोणासाठीं अभ्युदय मिळवावयाचा ? रामाला रावणाचें आसुरी राज्य नकोच होतें. त्याला अयोध्येचें स्वराज्य नको होतें, असें मात्र नाहीं. पण त्याहि पूर्वीं त्याला त्याची सीता पाहिजे होती. आम्हांला संपत्ति आणि स्वराज्य अवश्य पाहिजे आहे. पण त्यापूर्वीं आम्हाला आमची संस्कृति, आमचें हारपलेलें स्वत्व आम्ही परत मिळविलें पाहिजे. हेंच मोठें शल्य आहे. पुराणांतील नायिका म्हणजे श्रेष्ठतम अशा आर्यसंस्कृतीचीं प्रतिकेंच होत. यज्ञभूमि नांगरीत असतां म्हणजे यज्ञकर्माचें उद्घाटन अथवा चिकित्सा करीत असतां जी ब्रह्मविद्या प्रगट झाली तीच जणूं सीतादेवी होय असें मला वाटतें. दशमुख रावणानें म्हणजे दशेंद्रियग्रामाचा अधिपति जो अहंकार त्यानें बलात्कारानें ब्रह्मविद्या नेणें म्हणजे जर्मनींत आमच्या आर्यसंस्कृतीचीं पवित्र उपनिषदें नेण्याप्रमाणेंच व्यर्थ होतें. आत्मप्रभा तामसी अहंकारानें छपवावी, हेंच तें शल्य होय.

रामरावण युद्धानंतर लोकदृष्टीनें सीता भ्रष्ट झाली, असें मानून रामानें तिचा अव्हेर केला. तेव्हां सीतेनें रामासाठीं अग्निदिव्य केलें. प्रभु रामचंद्रांनीं याप्रकारें सीतारूप विद्येचें दिव्यत्व प्रगट केलें. तरी सुद्धां शुद्धाशुद्धतेचा आम्हींच निश्चय करूं जाणों असें मानणाऱ्या 'रजका'दि जडवादी लोकांना सीतारूप विद्येचा शुद्ध मार्ग पटेना, असें जेव्हां रामानें पाहिलें. तेव्हां रावणी अहंकाराच्या लंकेप्रमाणें हा मोहमदग्रस्त समाज

हें तुला राहण्यास योग्य ठिकाण नव्हे. तूं वाल्मिक ऋषींच्या आश्रमांतील एकांतांत सुखरूप ऐस, तेथेंच तुला बोधरूप पुत्र होवो. असा आशिर्वाद देऊन रामानें दूर ऋषींच्या आश्रमांत तिला पाठवून दिलें. व लवकरच अवतारसमाप्ति केली. कृष्णावताराचा शेवट असाच आहे. यादवांच्या ठिकाणीं रजस्तम जास्त वाढला. ते जडबुद्धीचे बनले, त्यांच्या ठिकाणीं भागवत धर्माचा लवलेश राहिला नाहीं, असें पाहून तो भागवतधर्म उद्धवाला सांगून त्याला श्रीकृष्णांनीं दूर बदरीकेदार येथें लावून दिला व आपली अवतारसमाप्ति केली! तात्पर्य, आपल्यामधील संस्कृति आपण गमावली म्हणजे मग आपणांत राम राहात नाहीं. व योगेश्वर कृष्णाची जोड दूरावते. मग आहिरांप्रमाणें

'समर्थाची नाहीं पाठी। त्यास भलताच कुटी ॥'

असा अनुभव आल्यास नवल काय? आपली संस्कृति आपण गमांविल्यास ती स्वराज्य प्राप्तीनंतर सीतादेवीप्रमाणें आपल्या पाठसि लागेल, अशा भलत्याच भ्रमांत आपण असूं नये. प्रभू रामचंद्रांची योग्यता त्यांची त्यांनाच. स्वेच्छेनें स्वसंस्कृतीचा त्याग करणाऱ्या अधमांना ती योग्यता कालत्रयीं प्राप्त होणार नाहीं. यास्तव संपत्तीच्या हव्यासापेक्षांहि संस्कृतीचें प्रेम हेंच श्रेयस्कर होय. संपत्तीचा हव्यास प्रापंचिकांस सहजच आहे. आणि तो कांहीं मर्यादेंत प्रापंचिकांस कांहींसा आवश्यकहि आहे.पण आम्ही आमच्या वैदिक धर्माचरणानें आणि वेदोक्त कर्मानीं अभ्युदय प्राप्त करून घेऊं, असा तो हव्यास पाहिजे. आतां जोंपर्यंत संस्कृति व अभ्युदय हीं दोन्हीं ध्येयरूप आहेत, तोंपर्यंत अभ्युदयासाठीं संस्कृति किंवा संस्कृतीसाठीं अभ्युदय यासंबंधीं व्यक्तींच्या गुणभेदानें मतभेद झाला, तरी त्यांत फारशी हानि नाहीं. हें जाणूनच सामान्य जनांचा वैभव हा जो प्रबल हतु तोच या पहिल्या प्रकरणांत मुख्य विषय घेतला आहे. परंतु गत वैभवाबरोबर

संस्कृति हानीचेंहि शल्य जाणवावें, म्हणून वरील विषयविस्तार केला आहे.

श्रीमंतीनें आणि संस्कृतीनें, उद्योगशीलतेनें आणि धर्मशीलतेनें, स्वातंत्र्यानें आणि स्वावलंबनानें पूर्वींचे आम्ही राहिलों नाहीं. हा विचार ज्यांच्या अंतःकरणांत अखंड जागत आहे व तोच ज्यांच्या जीवित कार्याचा प्रेरक आहे, अशाच पुरुषांचीं चरित्रें आज मार्गदर्शक होतील. परकीय संस्कृतीची आणि मालाची दलाली करून ज्यांनीं मोठेपणा मिळविला, ते आपले खरे आदर्श नव्हत. ज्यांनीं स्वकीय संस्कृतीची व्यर्थ निंदा करून तिला परकीय संस्कृतीचा वेश घालण्याचा उपद्व्याप केला, तेहि आपले आदर्श नव्हत. ज्यांना वर्णाश्रम धर्माचें अगत्य वाटत नाहीं, ज्यांना संत सद्गुरूंचें महत्त्व कळत नाहीं, जे सदा बहिर्मुख आहेत, तेहि आमचे आदर्श नव्हत. जे आर्यसंस्कृतीच्या त्यागाचे भूमिकेवर बसून स्वावलंबनानें व स्वधर्मपालनानें अभ्युदयाचा मार्ग दाखवितात, तेच आपणा प्रापंचिकांचे खरे आदर्श होत. असाच एक आदर्श या चरित्रांत आपणांस पहावयाचा आहे.

अनासक्ति आणि त्याग हे वाईट नाहींत. उलट त्यागानेंच अमृतत्वाची प्राप्ति होते. 'त्यागेनैके अमृतत्वमानशुः' असें औपनिषदिक वचन आहे. संस्कृति-संकराच्या नरकांत अमर होऊन काय करावयाचें! आजवर स्वत्वाच्या त्यागानें परतंत्र आणि वित्ताच्या त्यागानें नादार अनेक झाले! पण त्यागानें अमृत कोणीच मिळवीत नाहीं. घरेंदारें विकून मद्यार्कीचें सेवन करणारे अनेक असतील! जेथें साऱ्या औषधीहि मद्यमय झाल्या जेथें मात्रास्पर्शाच्या अपवित्रतेला सीमा राहिली नाहीं! जेथें जुलमांचीं अरिष्टें आणि दीनांचीं आसवें वाहवूं लागलीं! जेथें बुद्धि मोहांनीं ग्रस्त झाली व शरीरें संकरांनीं भ्रष्ट होऊं

लागलीं, तेथें भवरोगनिवृत्ति किंवा सत्वाचा विनाश होईल हें काय सांगावें ! तात्पर्य, चांगलें हातचें गेलें व वाईट हातीं आलें, असें हें विलक्षण स्थित्यंतर साऱ्याच हिंदुस्थान देशांत घडलें आहे !

स्थित्यतर होणें हा सृष्टीचा स्वभावच आहे.

**गेला तो नृप ते प्रधान अवघे ते पंडितांची सभा।**
**गेली ते नगरी तशी शशिमुखी ज्या तप्तहेमप्रभा ॥**
**गेला तो नृपपुत्र त्या शुभकथा ज्यां देखिलें सर्व जें।**
**तें जेणें स्मरणास योग्य रचिलें कालासि त्या वंदिजे ॥ १ ॥**

असें हें वर्णन भतृहरिपासून कवि करीतच आले आहेत. त्यांतल्यात्यांत तृषार्तांची तृषा शांत करण्यांत कोरडें पडलेलें सरोवरहि धन्य होय. अधन्य नव्हे, पण ओंहोरल्यामुळें जलहीन झालेलें तळें निंद्य होय. आमच्यांतलें सारें पाणी गेलें आणि पाखंडमताचे गोटे आणि अनास्थेचा चिखल मात्र माजला ! हें लांछन होयै ! ह्या चरित्राचे आरंभींच गत वैभवाचें स्मरण देण्यांतील हेतु इतकाच कीं, ज्यांना आपण एकदां वैभवशाली होतों, हें माहीत असतें, त्यांना प्राप्त झालेली वैभवहीनता पुरुषार्थप्रेरक होऊं शकते, व्यावहारिक दृष्टीनें काम आणि अर्थ हे पुरुषार्थच खरे. पण त्याचप्रमाणें अंतःकरणाच्या ठिकाणीं निःसंगता हा धर्महि पुरुषार्थच आहे व त्याचें पहिल्या दोन पुरुषार्थावर नियंत्रण असणें योग्य आहे. उत्कर्षाचे वेळीं वैभवाची अशाश्वता लक्षांत ठेवून मनानें निःसंग असावें. व अपकर्षाचे वेळीं गतवैभव आठवून तें सद्धर्मानें परत मिळविण्याकरितां उद्योगशील व्हावें, हेंच व्यावहारिकाच्या त्रिविध पुरुर्थांचें सार दिसतें. आणि त्याचसाठीं आरंभीं गतवैभवाचेंच स्मरण केलें आहे. गतवैभवाबद्दल तळमळ आणि स्वार्थासंबंधीं निरपेक्षता याच ह्या पुढील चरित्राच्या दोन बाजवा आहेत.

न तथा बाध्यते कृष्ण प्रकृत्या निर्धनो जनः ।
तथा भद्रां श्रियं प्राप्य तया हीनः सुखैधितः ॥

महाभारत ५।७२।२९

[ भावार्थ—उत्तम प्रकारचें वैभव प्राप्त होऊन सुखांत वाढलेल्या मनुष्यांला तें वैभव नष्ट झालें असतां जेवढें दुःख होतें, तेवढें, मूळांतच दरिद्री असलेल्या मनुष्याला होत नाहीं. ]





# प्रकरण २ रें

## राजापूर आणि पनवेल.

नादेशकाले किञ्चित्स्याद्देशकालौ प्रतीक्षताम् ॥
महाभारत ३।२८।३२.

[ देशकाल अनुकूल नसतां कांहीं होणार नाहीं. यास्तव देश-कालाकडे नजर द्यावी.]

ज्याप्रमाणें एखादा नट प्रत्येक प्रवेशाला आपला वेश पालटतो, त्याप्रमाणें समष्टिरूप परमेश्वर जो वरचेवर वेश पालटतो तोच देश-काल होय. किंवा ज्याप्रमाणें एखादा सूत्रधार भिन्नभिन्न कथानकांचीं नाटकें रचून दाखवितो, त्याप्रमाणें उत्कर्षापकर्षाचीं निरनिराळीं दृश्यें ईश्वर आपणांस दाखवितो. तेच तेच नट पुनः पुन्हा प्रवेश करितात, हें जसें खरें, त्याचप्रमाणें तेच तेच वेश आणि कथाप्रसंग नाटकांत पुनः पुन्हां दिसत नाहींत, हेंहि खरेंच. इतिहासाची पुनरावृत्ति होते, आणि होत नाहीं, या दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत. आजच्या अपकर्षाप्रमाणें या देशांत पूर्वीं कधीं अपकर्ष नव्हता असें नाहीं. एकाच रंगभूमीवर शोकरसप्रधान अनेक खेळ होतात. पण प्रत्येक खेळांतील कथानक, वेश आणि भाषा हीं भिन्न असतात. पूर्वीचा सजलेला शिवाजी आज राष्ट्राच्या रंगभूमीवर पुढें येऊन पूर्वीचेच चिठ्ठे पाठ म्हणूं लागला व पूर्वीचेच अभिनय करूं लागला, तर तें उपहासास्पद होईल. भावमिश्र

आणि वाग्भट हे आज जसेच्या तसेच कामास येणार नाहींत. आजचा खेळ वेगळा व पूर्वीचा खेळ वेगळा.

पण असा जरी भेद असला, तरी नाट्यशास्त्र या दृष्टीनें पूर्वीचें अनासक्ति आणि आवेश, अथवा अंतःस्त्यांगी बहिःसंगी असें अभिनयाचें कसब आजहि उपयोगी पडेल. या दृष्टीनें पूर्वेतिहासाचें पर्यालोचन उद्बोधक ठरतें. तसेंच आम्हांला तो शोकरसप्रधान खेळच नको असेल, अभ्युदयाचे वेषांतच नट पहावा अथवा अभ्युदयाचाच खेळ पहावा, अशी उत्कंठा असेल तर आपल्याला देशकालरूप सूत्रधार अनुकूल करून घेतला पाहिजे. एवंगुणविशिष्ट सूत्रधाराच्या अनुकूलतेच्या आवश्यकतेकडे लक्ष न देतां जे इतिहासांतील उत्कर्षापकर्षाकडे पाहतात व भावि उत्कर्षाचीं अनुमानें बांधितात, त्यांना उत्कर्षापकर्षाचें खरें रहस्य निश्चित न समजल्यामुळें ते फजित पावतात. भगवंताचें इच्छेचें अधिष्ठान शोधलें पाहिजे. यास्तव देशकालरूप जी भगवद्दीला तिचें सूक्ष्म निरीक्षण करणें आवश्यक आहे.

भारतवर्षानें अनेक उत्कर्ष आणि अपकर्षाचे खेळ पाहिले आहेत. अपकर्षाचा काल सहजच कठीण वाटतो. उत्कर्षाचे वेळीं आपण कसें वागावें, हा कधींच कोणास विचार पडत नाहीं. हरिश्चंद्र राजाला सिंहासनावर बसून न्यायमनसूबा करणें सोपें होतें. पण डोंबाच्या घरीं काम करितांना त्याची घडोघडीं फजिती होई ! सीतादेवी वस्त्राभरणांचा शृंगार करण्यांत कुशल होती. पण वल्कलें नेसतांना ती खजिल झाली ! तरवारीच्या मुठीनें घट्टे पडलेले आल्फ्रेडचे हात गरीब शेतकऱ्याच्या भाकऱ्या भाजतांना भाजूं लागले ! आपत्काळीं मनुष्य सहजच किंकर्तव्य मूढ होतो. पण अशा वेळीं स्वत्वाचें भान सुटणें सोयीचें नसतें. तें स्वत्वाचें भानच,—ती आपल्या संस्कृतीची जागृतीच—खरी तारक ठरते. वरील उदाहरणांत या स्वत्वरक्षणानेंच

त्यांस पूर्वपद प्राप्ति झाली. आपल्यालाहि पूर्वपद प्राप्ति होणें हें आपण आपल्या स्वत्वाला जागण्यावर, स्वावलंबनावर, स्वाभिमानावर अवलंबून आहे. रशिया किंवा जपान, इंग्लंड किंवा अमेरिका यांचें अनुकरण करण्यावर अवलंबून नाहीं. आपली मायभूमि व मनोभूमि परकीयांच्या आक्रमणानें भ्रष्ट झाली, त्यावेळीं हिंदी राष्ट्र आपलें स्वत्व कसें विसरलें आणि स्वराज्यापासून व स्वाराज्यापासून कसें भ्रष्ट झालें तें संक्षेपतः मागील प्रकरणांत दर्शविलें. आतां ज्या स्थल विशेषांशीं चरित्र नायकाचा संबंध पोहोंचतो, त्या प्रांताच्या पूर्वेतिहासाकडे वळूं.

प्रत्येक व्यक्तीच्या शिक्षणावर, संगतीवर, उद्योग-धंद्यावर, धार्मिक व नैतिक आचरणावर, प्रकृतीवर फार काय त्याच्या जीवनक्रमांतील प्रत्येक गोष्टीवर बहुधा सभोंवतालच्या इतिहासयुक्त परिस्थितीचा स्पष्टास्पष्ट परिणाम होत असतो. याप्रमाणें परिस्थितीचा परिणाम जेथें स्पष्ट दिसत असेल, तेथें त्या चरित्राच्या रहस्याचें मूळ सापडलें असें होतें. तो परिणाम प्रगतीला प्रतिबंधक झाला नसेल तर चरित्रनायकाचें स्वत्व विशेष प्रमाणांत झळकलें, असें म्हणावें लागतें. याप्रमाणें चरित्राच्या अभ्यासाच्या दृष्टीनें देशकालविचार अगत्याचा ठरतो.

कोंकणांतील ठाणें, रत्नागिरी आणि कुलाबा ह्या जिल्ह्यापुरताच उत्कर्षापकर्षाचा विचार करितां ठाणें जिल्ह्यांतील माझी जन्मभूमि वसई, रत्नागिरी जिल्ह्यांतील माझ्या चरित्र नायकाच्या कुटुंबाचें मूळ ठिकाण, तालुका राजापूर व कुलाबा जिल्ह्यांतील त्यांची जन्मभूमि तालुका पनवेल, हीं बंदरें पूर्वीं व्यापाराकरितांच प्रसिद्ध असत. ह्या तिन्ही ठिकाणीं एकसूत्री राजछत्र कांहीं काळ टिकलें.

रत्नागिरी जिल्ह्यांत राजापूर तालुक्यांतील मुचकुंदी नदीच्या कांठीं सांठवली गांवीं पूर्वीं फार मोठा व्यापार चालत असे. तो इतका कीं,

त्या व्यापाराचे संरक्षणासाठीं तेथें एक किल्ला पूर्वीं बांधलेला आहे. त्याचप्रमाणें राजापूर येथेंहि किल्ला आहे. व राजापूर बंदर हेंहि पूर्वीं व्यापारासाठीं फार प्रसिद्ध होतें. येथून मलबार, घाट, सुरत, कच्छ, अरबस्थान व आफ्रिका यांच्याशीं व्यापार चाले. त्यामुळें हें शहर लक्षाधीश असे शेट, सावकार व व्यापारी यांनीं गजबजलें होतें. शिवाय राजापुरची गंगा व श्रीधोपेश्वर हीं तीर्थक्षेत्रें प्रसिद्धच आहेत. पण देशकालपरत्वें त्यांचेंहि महात्म्य कमी होत चाललें आहे. जी गोष्ट राजापुरची तीच पनवेलची व वसईची आहे. वसई व अर्नाळा येथील किल्ले जसे प्रसिद्ध आहेत, त्याचप्रमाणें पनवेलचा कर्नाळा व इतर किल्ले प्रसिद्ध आहेत. या तिन्ही ठिकाणच्या भाग्यनाशाला साक्षात् कारण बहुतांशानें तेथील परकीय सत्ता होय. राजापूर हें मुसलमान, मराठे व आंग्रे यांच्या ताब्यांत होतें. अद्यापही मुसलमानांची वस्ती तेथें बरीच आहे. शिवाजीनेंहि राजापुरावर दोन वेळां छापा घालून बरीच लूट नेली. त्यांत बाळाजी आवजी चिटणीस हें एक अमोलिक रत्न त्यास मिळालें.

राजापूर तालुक्यांत राजापूर व सांठवली या उपरिनिर्दिष्ट दोन गांवांच्या मधोमध पेंडखळें म्हणून एक हवाशीर बागायती खेडें गांव आहे. तेथें शंकर-गणपतींचीं देवस्थानें असून दरसाल पौष शु. १५ रोजीं गणपतीचा मोठा उत्सव होऊन जत्रा भरते व लोक गोंधळ घालतात. हें पेंडखळच पुराणिकांचें मूळगांव होय. याच तालुक्यांतील श्रीधूतपापेश्वर अथवा धोपेश्वर हे पुराणिकांचें कुलदैवत आहे. आणि याच श्रीक्षेत्र धोपेश्वराचे पुराणिक सुप्रसिद्ध सत्पुरुष श्री. रघुनाथ उर्फ काका महाराज हेच चरित्रनायकाचे सद्गुरु होत.

पनवेलच्या पुराणिक घराण्याचे मूळ पुरुष गंगाधर भट बिन नारायण पुराणिक हे सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं मयत झाले. त्यांनीं त्या गांवची



श्रीधूतपापेश्वर मांदिर' —श्री क्षेत्र धापेश्वर [पृ. १८

कांहीं जमीन इनामी संपादन केली. ह्या गंगाधर भटजींचे चिरंजीव विनायक भट, ह्यांचे लक्ष्मण भट, लक्ष्मण भटजींचे जगन्नाथ भट व जगन्नाथ भटजींच्या पांच चिरंजीवांपैकीं एक विश्वनाथ भट, हेच प्रथम कर्जत तालुक्यांतील अतकर गांवास राहून मग पनवेलीस आले, असें दिसतें. पुढें ह्यांच्याच वंशांत चरित्रनायकाचा जन्म पनवेल नजीकचे पळस्पें गांवीं झाला.

पनवेलचीं राज्यसूत्रें कर्नाळच्या किल्ल्यावरून पूर्वीं हालत असत. तेरावें शतकाचे उत्तरार्धात येथें यादवांचें राज्य असे. पुढें पंधरावें शतकांत पनवेल विजापुरकरांकडे गेली. सोळाव्या शतकांत पोर्तुगीज यांचे अमलांत पनवेल हें दुय्यम प्रतीचें व्यापारी शहर होतें. पुढें सन १७७८ नोव्हेंबर तारीख २६ रोजीं पनवेल व खोपविली येथें मराठ्यांशीं इंग्रजांच्या झटापटी झाल्या. सन १७८१ मध्यें नानांनीं इंग्रजांचा कर्नल गाडर्ड यास पक्का चोप दिला. त्यावेळीं हैदराला भिऊन इंग्रज मराठ्यांशीं जुळतें घ्यायला पहात होते. पण या मसलतीस नाना कबूल झाले नाहींत.

सन १८०३।४ सालीं पनवेलीस दुष्काळानें अतिशय माणसें मेलीं, सन १८०४ च्या सप्टेंबर महिन्यांत एक इंग्रज लॉर्ड पनवेलीहून खंडाळ्याला जात असतां वाटेंत ठिकठिकाणीं त्याला पुष्कळ माणसें अन्नावांचून मरून गिधाडांच्या भक्षस्थानीं पडलीं आहेत, असें आढळलें ! यानंतर सन १८१७ सालीं पनवेल येथें सातशें पेंढाऱ्यांशीं इंग्रजांची लढाई झाली. सन १८१८ सालीं कर्नाळा इंग्रजांच्या ताब्यांत गेला. आणि पुढें साठ वर्षांनीं सन १८७७ सालीं पनवेल तालुक्यांतलि शिरढोण गांवचे वासुदेव बळवंत फडके यांनीं बंड उभारलें व त्यांचा पळस्पें येथें ओझे यांच्या वाड्यावर दरोडा पडला. या शिवाय इंग्रजांची सत्ता पनवेल येथें सन १८१० नंतर

अबाधित सुरू आहे. याप्रमाणें पनवेलचा थोडक्यांत राजकीय इतिहास आहे. पनवेलीवर कित्येक राज्यें आलीं व गेलीं. पण या वरंवर होणाऱ्या राज्यक्रान्त्यांचा येथील समाजाच्या अंतः-स्थितीवर कितपत परिणाम झाला असेल तें सांगवत नाहीं. चौकच्या नेताजी पालकराशिवाय या तालुक्यांतील रणगाजींचीं घराणीं ऐकिवांत नाहींत. यावरून येथील लोक शेती आणि व्यापार यांतच सदा गुंतलेले असावेत, असें दिसतें. मलंगड, चंदेरी, पेबचा किल्ला, प्रबळचा किल्ला, विशाळगड, माणिकगड व कर्नाळा अशा किल्ल्यांनीं पनवेल परिवेष्ठित आहे, हें खरें. पण ह्या निरनिराळे किल्ल्यांचे किल्लेदार काय मर्दुमकी गाजवीत व त्यांचे वंशज आज कोण कोठें आहेत, हें कांहींच समजत नाहीं. ज्याप्रमाणें तीं घराणीं नामशेष झालीं, त्याप्र-माणें या किल्ल्यांच्या पडक्या तटांपलीकडे व पाण्याच्या टाक्यां-शिवाय, तेथें पूर्वीच्या वैभवाचें चिन्ह कांहींच उरलेलें नाहीं.

पनवेलचे दुसरे विशेष म्हणजे येथील विस्तृत तलाव होत. बल्लाळे-श्वरच्या पाड्यावरील वडाळें हें पूर्वी २०४६×१६५०×११ फूट इतकें विस्तीर्ण होतें. आणि कृष्णाळें ११२२×९२४×९ फूट इतकें मोठें होतें. याशिवाय ह्या तालुक्यांत गाडी रस्त्याला आणखीहि कांहीं मोठालीं तळीं आहेत. पनवेलचे हे फार मोठे तलाव, गाड्यांच्या तळाच्या जागा, माल ठेवण्याचे विस्तृत धक्के, चाक जोड तयार करण्याचे कारखाने, ठिकठिकाणीं पडलेल्या तेलाच्या प्रचंड लोखंडी टाक्या, हे पनवेलच्या पूर्वीच्या फार मोठ्या व्यापाराचे अवशेष आहेत. रेल्वेनें मालांची नेआण सुरू होईपर्यंत पनवेल हीच घाटावरील मालाची उतार पेठ होती. अगदीं अलीकडे म्हणजे १८८०।८१ सालीं या प्रांतांतील पनवेल, बेलापूर, चेंबूर आणि खेरणें या चार बंदरांतून सालीना सव्वादोन कोटींची देवघेव होत असे. भात,

सडीक तांदूळ, गहूं, चणे, तेल, तूप, विटा, कौलें, रेती, गवत, भाजीपाला, गुरेढोरें, चाकजोड, जळाऊ किटा वगैरे माल या बंदरांतून ठाणें, सुरत, भडोच, भावनगर वगैरे प्रांतांत जात असे. आणि उलट सोलापूर, सातारा, वऱ्हाड, नागपूर, मुंबई वगैरे ठिकाणांहून मका, जोंधळा, गहूं, साखर, खोबरें, तेल, कापड, मच्छी आणि दारू इकडे येत असे. हा व्यापार येथील वाणी, भाट्ये, लिंगायत, मराठे आणि कोळी यांच्या हातीं असे.*

सन १८३५ सालीं येथें भाताला भाव दर खंडीस तेरा रुपये असे. कुलाबा जिल्ह्याला भाताचें कोठार असें म्हणतात. पण येथील एकंदर देशस्थिति विशेष समाधानकारक नव्हती. लोक गरीब, दुबळे व अशिक्षित होते. त्याकाळीं सडका नव्हत्या, शेतकऱ्यांजवळ गाड्याहि नसत व गुरेंहि फारशीं नसत. पांढरपेशांकडून शेतकरी लोक वाफ्यानें नांगरकीचीं जनावरें नेत असत. एका हंगामाला बैलाच्या जोडीला बारा मण व टोणग्याच्या जोडीला चवदा मण भात वाफ्याचें द्यावें लागे. या तालुक्याची लोकसंख्या शंभर वर्षापूर्वी सुमारें एक लाख बारा हजार होती. पैकीं $\frac{1}{3}$ लोकसंख्या आग्ऱ्यांची असे. सव्वा आठ हजार मराठे, अडीच हजार मुसलमान आणि सव्वादोन हजार ब्राह्मण, प्रभु व इतर पांढरपेशे असें वस्तीचें मान असे. पांढरपेशांत ब्राह्मणांची संख्याच जास्त असे. चांभार, महार, मांगांचीहि वस्ती बरीच म्हणजे साडेपांच हजारांवर असे.

---

* पनवेल शहर बहु गुलजार । बाग लाविले चौफेर ।
खाडी किनारीं धक्का बांधिला । कोडत हाफिस गुलजार ॥
ईश्वराची अजब करणी । जहाजें चालती पाण्यावर ।
तऱ्हेतऱ्हेचे शीड लावुनि । जहाजें आलीं पहा बंदरावर ॥
इ० याप्रमाणें एक पूर्वीचा शाहीर पनवेलचें वर्णन करितो.

सन १८४० सालीं देशांत पुन्हा महर्गता उत्पन्न झाली होती. पुढें सन १८५६ नंतर या प्रांताची स्थिति बरीच सुधारली. लोकांचें स्वास्थ्य वाढलें. कांहीं घराणीं श्रीमान् झालीं. परदेशी व कायस्थ प्रभु हे त्या काळीं आजच्यापेक्षां जास्त सुखी होते. भात, पेंढा व गवत या जिनसांचा मुंबईशीं व्यापार वाढला. पण त्याचबरोबर शेतकरी लोकांत मद्यपानाचें व्यसनहि फार बळावलें. यामुळें शेतकरी वर्ग फारसा सुधारला नाहीं.

पनवेलचें पूर्वीचें सर्वांत मोठें घराणें श्री. बापट यांचें दिसतें. यांचे मूळ पुरुष बाळाजी कृष्ण बापट हे मूळचे गुहागरचे राहणारे. त्यांचे चिरंजीव पुरुषोत्तम बाळाजी यांस कल्याण भिंवडी प्रांताची जकातीची मामलत होती. त्या मामलतीच्या एका सनदेंत, वरतीं मायना " पुरुषोत्तम बल्लाळ गोसावी यांस सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार " असा आहे. हे पुरुषोत्तम बल्लाळ पालखीपदस्थ होते. यांच्याच घराण्याकडे पुढें हें जकात मामलतीचें काम तीन पिढ्या राहिलें. असें सांगतात कीं येथील बल्लाळेश्वर मंदिर बाळाजी बापटांनीं बांधलें. ह्यांचें कुटुंब कृष्णांबाई यांनीं कृष्णेश्वराचें देऊळ बांधलें. पण हीं दोन्हीं देवळें ह्यांनीं आपल्या नांवानेंच बांधल्यामुळें गौरी विरूपाक्ष हें देऊळ ह्यांनींच आणखी आपल्या स्वतंत्र पूजेकरितां बांधलें. वडाळें तलाव मूळ कोणी केव्हां बांधला, तें जरी नक्की कळण्यास मार्ग नाहीं, तरी त्याची डागडुजी पूर्वी बापट यांचे कडून होत आली आहे व कृष्णाळें हें तळें त्यांनींच बांधल्याचा इतिहासांत उल्लेख आहे.

या बापटांकडे पूर्वीं करमल्लीशहा नामक मुसलमान बैठकी घालण्याचे कामावर नोकर असे. पुढें तो फकीर बनला व त्याच्या कृपेनें पुरुषोत्तम बल्लाळ बापट यांचा पुष्कळ लाभ झाला. या

करमल्ली शहा पीराचा एक सुंदर दर्गा बापटांचे वाड्यापासून थोड्या अंतरावर देवाळें नामक तळ्याचे काठीं आहे. तेथें दरसाल माघ शु. ११ ला फार मोठा उरुस भरतो. या उरसांत विक्रीसाठीं वसई प्रांतापासून माल येत असे. तो कांहीं काळ जकातीमुळें कमी पडला होता, पण बापटांचे मध्यस्थीनें जकात कमी होऊन पुन्हा व्यापार सुरू झाला. या उत्सवांत बापट घराण्याकडे विशेष मान अद्याप चालू आहे. येथील बापट घराण्यासंबंधीं अनेक ऐतिहासिक आख्यायिका आहेत. त्या सर्व येथें विस्तारभयास्तव देतां येत नाहींत. या घराण्याशीं चरित्रनायकाचा विशेष घरोब्याचा संबंध असे.

सुमारें शेंपन्नास वर्षांचे पूर्वीं बापटांच्याप्रमाणें येथील गुळवे यांचें घराणें व्यापारासंबंधीं फार प्रसिद्ध होतें. खंडाप्पा मोराप्पा गुळवे व विठोबा खंडाप्पा गुळवे हीं नांवें उत्तर कोकणांत चांगलीं प्रसिद्ध आहेत. कै. विश्वनाथ नारायण मंडलीक यांचा कै. खंडाप्पा मोराप्पा यांच्याशीं स्नेह होता. आणि व्यवहारहि होता. तसेंच कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर व कै. केरूनाना छत्रे यांचा विठोबा खंडाप्पा गुळवे यांच्याशीं विशेष स्नेह होता. पनवेलच्या पुराणिकांचाहि या घराण्याशीं विशेष संबंध असे. ह्या विठोबा शेटची वड्याळ्यावरील बाग हें पनवेळचें एक वेळचें भूषण असे. येथें कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं आपली पहिली किर्लोस्कर संगीत नाटक मंडळी स्थापन केली. ती मुख्य बाग आंतील दोन इमारतीसह त्यांचे दानशूर नातू ( मुलीचा मुलगा ) श्री. आत्माराम शेट आटवणे यांनीं कोंकण एज्युकेशन सोसायटीचे शाळेस नुकतीच बक्षीस दिल्यामुळें, तेथें हल्लीं पूर्वींचीं फुलझाडें नसून त्याहून श्रेष्ठ प्रकारचीं सुमनें फुलत आहे !

नाना फडणीसांची शेवटची बायको जिऊबाई ही नाना वारले तेव्हां अवघी नऊ वर्षांची होती. नानांच्या धनाच्या लोभानें दुसऱ्या

बाजीरावानें तिला अटकेंत ठेवली होती. पण पुढें इंग्रजांचे मध्यस्थीनें ती अटकेंतून मोकळी होऊन त्यांच्याच आश्रयानें ती पनवेल येथें राहूं लागली. पण ती तेथें फार दिवस राहिली नाहीं. बाजीरावाच्या जाचाची भीति गेल्यावर ती पनवेलीहून परत पुण्यास गेली. यामुळें पेशवाईची अखेर पाहिलेल्या या एका शीलसंपन्न कर्तबगार बाईच्या सहवासाचा लाभ पनवेलकरांस फार काळ लाभला नाहीं. हल्लीं जिऊबाईसाहेबांच्या वाड्याचा चवथरा मात्र शिल्लक आहे.

पनवेलच्या इतिहासांतील आणखी एक दोन चमत्कारिक गोष्टी सांगावयाच्या तर येथें नानांच्या बायकोच्या वाड्याचे आसपास परदेशांची वस्ती असे. व त्यांत कोणी सुमेरसिंग गारद्याचेहि नातलग असावेत असें म्हणतात. सन १८५७ सालच्या बंडाचे वेळीं इंग्रजांशीं दोस्ती राखणारे बडोद्याचे दिवाण कै. गणेशपंत ओझे यांचें पळस्पें हें गांव पनवेलपासून दोन मैलांवर आहे.[१] तें माझ्या चरित्रनायकाचें अजोळ होय.

पुढील चरित्र विशेषें करून ज्या ठिकाणीं घडलें, त्या पनवेलची त्रोटक हकीकत वर दिली आहे. खुद्द पनवेल शहर व आजुबाजूचीं या तालुक्यांतलि खेडीं यांचें सूक्ष्मावलोकन केल्यास पनवेल तालुका पहिल्या प्रकरणाच्या मथळ्यावरील श्लोकाप्रमाणें गतवैभव झाला आहे, असेंच दिसून येईल. श्रीमंत बापट यांच्या वाड्यांतील पूर्वींच्या हत्ती

---

**टापि:**–आणखी कांहीं गोष्टी म्हणजे [१] मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजच्या एका प्रिन्सिपालनें दुसरा बाजीराव या नांवाची एक इंग्रजी कादंबरी लिहिली आहे. त्या कादंबरीचा नायक एक लष्करी इंग्रजी अंमलदार या तालुक्यांतील माची प्रबळचे किल्ल्यांत अटकेंत पडला होता, असें वर्णन आहे. [२] एका आधुनिक कादंबरीकारानेंहि पनवेल आपल्या कादंबरींत गुंतविली आहे. आणि [३] पनवेल तालुक्यांतील सन १९३० सालच्या चिरनेरच्या जंगलच्या सत्याग्रहानें महाराष्ट्रांतील सत्याग्रहाच्या इतिहासांत पनवेलचा उल्लेख अवश्य केला आहे.

बांधण्याच्या जागा कोणत्या तें आतां ओळखूंहि येत नाहीं. व त्यांच्या समोरच्या गुळवे यांच्या घराण्यांतील प्रचंड व्यापाराच्या उलाढालीचा, ते आपल्या घराच्या ओटीला दुकान किंवा पेढी असें म्हणतात या पलीकडे, मागमूसहि राहिला नाहीं. पनवेलच्या बाजारपेठेंत एका काळीं संपत्तीचा धूर निघत असावा ! पण आतां तेथें कांहींच त्राण उरलेला नाहीं. आणि कांहीं वर्षांपूर्वीं जेथें स्वास्थ्य नांदत असावें, अशीं पळस्पें, कराडें, गुळसुंदे, मोहपाडा, चिखलें, नेरें, वांवजें हे या तालुक्यांतील पांढरपेशा वस्तीचें सुखवस्तु गांव हळूं हळूं ओस पडत चालले आहेत ! केवळ शेतीवर प्रपंचाचा चरितार्थ भागत नाहीं, यामुळें घरोघरचे तरुण, पोटार्थी होऊन मुंबईचा रस्ता धरीत आहेत. इतकेंही करून या तालुक्यांतील पांढरपेशा वर्गातील घराणीं जीं पूर्वीं साधारणतः सुखवस्तु होतीं, त्यांपैकीं आतां निष्कर्जी किती आढळतील, याबद्दल शंकाच वाटते ! साऱ्या देशाची जी गति तीच या तालुक्याची आहे. इनकम टॅक्स खात्याला विचारलें तर तें खातें मात्र या तालुक्याची भरभराट आहे असेंहि इनकम टॅक्सचे आंकड्यांवरून सांगेल ! या तालुक्याची धाऱ्याच्या वाढीची ओरड शंभर वर्षांपूर्वीपासूनची आहे. तरी पण सरकारनें येथील धाऱ्याची नुकतीच वाढ केली आहे.

या तालुक्यांत भाताच्या गिरण्या झपाट्यानें वाढल्या आहेत. बैलगाड्यांसारख्या मोटारगाड्या खेडोखेडीं सवंग झाल्या आहेत. पनवेल शहरांत घरांच्या जवळजवळ बरोबरीनें दुकानें आहेत.किराणा मालाचीं दुकानें, कापडाचीं दुकानें, शिंप्याचीं दुकानें, चहाचीं हॉटेलें, पानतंबाखूचीं दुकानें व खाणावळी यांची संख्या गेल्या पन्नास वर्षांत पुष्कळच वाढली आहे. तसेंच वकील आणि डॉक्टर यांची संख्याहि पूर्वींच्या तिप्पट चौपट झाली आहे. येथें नवीन झालेल्या कोंकण एज्युकेशन

सोसायटीच्या हायस्कुलामुळें मुलांच्या इंग्रजी शिक्षणाची सोय झाली आहे. त्याचप्रमाणें येथील देवस्थानांची स्थितीहि पूर्वींच्या मानानें पुष्कळच सुधारली आहे. नवीन व्यायाम शाळेचीहि पनवेलीस उत्तम सोय झाली आहे. तसेंच येथें आजच्या कालमानाप्रमाणें डॉ. पटवर्धन यांच्या विशेष खटपटीनें व चिकाटीनें सूतिकागृहाचीहि नमुनेदार संस्था झाली आहे.

पण वरवर दिसणाऱ्या ह्या उत्कर्षाच्या चिन्हांच्या व चांगल्या संस्थांच्या बुडाशीं अपकर्षाची दुर्निवार कीड लागली आहे. संस्कृतिहानि, दारिद्र्य, औदासिन्य आणि अशांति असे दुर्धर रोग समाजाला जडले आहेत. आणि होत असलेला ऱ्हास थांबविण्यास हे प्रयत्न अद्याप अपुरेच पडत आहेत.

वरील अनुक्रमाच्या व्युत्क्रमानें लिहावयाचें तर सूतिकागृहांच्या सोयीनें बाळंतपणांतून उठलेल्या स्त्रियांचें आरोग्य सुधारलें नाहीं. व्यायामशाळेच्या मानानें मुलांच्या ताकतीचें व उमेदीचें मान वाढलें नाहीं. ज्या मानानें देवालयें सुधारलीं आहेत, त्या मानानें लोकांची धर्मभावना वाढलेली नाहीं. उलट तिला ओहोटीच लागली आहे. येथें जर आणखी इंग्रजी स्त्री-शिक्षणाचीहि सोय होईल, तर रात्रीप्रमाणें दिवसाहिं देवळें बंद करण्याची वेळ एक दोन पिढ्यांत येईल, असा संभव दिसतो! मुलांच्या शिक्षणाच्या सोयीनें निराशेला सुशिक्षित केलें आहे, इतकेंच ! डॉक्टर आणि वकिलांची वाढ ही त्यांच्या व इतरांच्या दृष्टीनें शुभसूचक नाहीं, हें उघडच आहे. पावसाळ्यांत माजणाऱ्या रानाप्रमाणें वर दर्शित केलेलें दुकानदारांचें रान अल्पजीवी व निष्फळ आहे ! खाणावळींची संख्या वाढणें यांत गृहस्थाश्रमाची ओढघस्तच उघडकीस येते, हेंहि उघड आहे. ज्यांची कर्ज काढण्याची हिम्मत चार आकड्यांवर आहे, ते भात भरडण्याच्या गिरण्या काढ-

तात, ज्यांची हिम्मत तीन आकड्यांवरच आहे, ते मोटारींचा धंदा करतात. अखेर भांडवलाच्या बुडींत मालकहि कर्जांत बुडतात. अखेर, गिरणीवाल्यांच्या दाराशीं तुसाचे ढीग व मोटारवाल्यांच्या पोरांना खेळायला चाकांचीं रबरी टरफलें इतकेंच भूषण उरतें !

याप्रमाणें ग्रथारंभीं घेतलेल्या सुभाषिताप्रमाणें, अथवा कुभाषिताप्रमाणें असें वाटल्यास म्हणा, या तालुक्याच्या पूर्वीच्या व आजच्या परिस्थितीचें त्रोटक वर्णन आहे.त्यांत प्रतिकूल देशकाल अनुकूल करून घेण्याचे वरचेवर प्रयत्न दिसत आहेत. या सर्व निराशेच्या राज्यांत एकच आशेचा अंकुर उगवला, या बुद्धिबलाच्या डावांत बुरजीच व्हावयाची. पण ईश संकेतानें प्याद्याचा फर्जी होऊन डाव अद्याप टिकला. तन, मन आणि धन हे तिन्ही धातु बिघडले असतां एका नामांकित चिकित्सकाची ईश्वरानें येथें योजना केली व आयुर्वेदशास्त्र, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र या शास्त्रत्रयांच्या उत्कृष्ट संगोपनानें त्रिदोषांचा परिहार कसा करावा, ह्या कूट प्रश्नाचें एक गोडसें समाधानकारक उत्तर परम दयाळू श्रीधूतपापेश्वरांनीं सुचविलें आहे. तेंच पुढें या अल्प चरित्र रूपानें वर्णन करावयाचें आहे. वर जी पनवेलची अत्यंत निकृष्ट होत चाललेली अंतर्स्थिति वर्णिली, तीच साऱ्या हिंदुस्थानची स्थिति आहे. अशा या प्रतिकूल देशकालपरिस्थितींत आरोग्य–विद्या–धन संपादण्याचे प्रयत्न पनवेल प्रमाणेंच पनवेलच्या बाहेर सर्वत्र सुरूच आहेत. त्यांत ईश्वराच्या अधिष्ठानावर उभारलेल्या एका दृढोद्योगाचें चित्र आदर्श म्हणून या ग्रंथद्वारां वाचकापुढें ठेवीत आहे.

**विद्या तपो वा विपुलं धनं वा।**
**सर्वं ह्येतद्व्यवसायेन शक्यम् ॥** महाभारत

[ विद्या काय, तप काय, अथवा विपुल द्रव्य काय हें सर्व उद्योगानेंच मिळविणें शक्य आहे. ]

---



# प्रकरण ३ रें.

## पुराणिक

**किमिति सखे परदेशे गमयसि दिवसांन्धनाशयलुब्धम् ।**
**वर्षति मौक्तिकनिकरं तव भवनद्वारि कांचनी वल्ली ॥।**

सुभाषित.

" अरे, मित्रा ! धनलाभाच्या लोभानें दूरदेशीं कशाला जातोस ? तुझ्या घराच्या दाराशीं उभ्या असलेल्या तुझ्या सुवर्णलतेच्या नेत्रांवाटें मोत्यांची धार लागली आहे ! इकडे पहा ! "

वरील सुभाषित लाक्षणिक मानून त्याचा परमार्थतः अर्थ केल्यास तो जितका खरा आहे, तितका व्यावहारिक दृष्टीनें वरील मित्रोपदेश योग्य आहे, असें म्हणवत नाहीं. 'जिथें पिकतें तेथें विकत नाहीं,' 'गांवचा पांड्या परगांवचा देशपांड्या' अशा म्हणींतील रहस्य वरील सुभाषिताच्या अगदींच विरुद्ध आहे. युरोपमधील स्वयंबहिष्कृत झालेल्या लोकांनीं देशत्याग केला, त्यामुळेंच इतक्या अल्पावधींत अमेरिका हें चौथें खंड शोधून काढून तें साऱ्या जगाच्या शिरोभागीं चढलें. पूर्वटोंकाचे कांहीं धाडशी जपानी पश्चिम टोंकाला गेले, आणि आज अखिल आंतरराष्ट्रीय शांतता परिषदेस खुशाल धाब्यावर बसविण्याचें सामर्थ्य व आत्मविश्वास त्यांनीं एका शतकाचे आंतच मिळविला. लॉर्ड क्लाइव्ह आणि वारन हेस्टिंग्ज या अत्यंत अप्रसिद्ध साहसी पुरुषांनीं



# प्रकरण ३ रें.

## पुराणिक

किमिति सखे परदेशे गमयसि दिवसांन्धनाशयलुब्धम् ।
वर्षति मौक्तिकनिकरं तव भवनद्वारि कांचनी वल्ली ॥!

सुभाषित.

" अरे, मित्रा ! धनलाभाच्या लोभानें दूरदेशीं कशाला जातोस ? तुझ्या घराच्या दाराशीं उभ्या असलेल्या तुझ्या सुवर्णलतेच्या नेत्रांवाटें मोत्यांची धार लागली आहे ! इकडे पहा ! "

वरील सुभाषित लाक्षणिक मानून त्याचा परमार्थतः अर्थ केल्यास तो जितका खरा आहे, तितका व्यावहारिक दृष्टीनें वरील मित्रोपदेश योग्य आहे, असें म्हणवत नाहीं. ' जिथें पिकतें तेथें विकत नाहीं,' ' गांवचा पांड्या परगांवचा देशपांड्या ' अशा म्हणींतील रहस्य वरील सुभाषिताच्या अगदींच विरुद्ध आहे. युरोपमधील स्वयंबहिष्कृत झालेल्या लोकांनीं देशत्याग केला, त्यामुळेंच इतक्या अल्पावधींत अमेरिका हें चौथें खंड शोधून काढून तें साऱ्या जगाच्या शिरोभागीं चढलें. पूर्वटोंकाचे कांहीं धाडशी जपानी पश्चिम टोंकाला गेले, आणि आज अखिल आंतरराष्ट्रीय शांतता परिषदेस खुशाल धाब्यावर बसविण्याचें सामर्थ्य व आत्मविश्वास त्यांनीं एका शतकाचे आंतच मिळविला. लॉर्ड क्लाइव्ह आणि वारन हेस्टिंग्ज या अत्यंत अप्रसिद्ध साहसी पुरुषांनीं

सातासमुद्रापलीकडे हिंदुस्थानांत येऊन त्यांनीं सुमारें अर्ध शतकांत इंग्लंडला अत्यंत गब्बर केलें! आर्यांचें मूळचें वसतिस्थान कोठचेंहि असो, त्यांच्या दिग्विजयाचें स्थान त्यांच्या मूळस्थानापासून पुष्कळच दूर होतें. कोठें अयोध्या आणि कोठें रामरावण युद्ध! शंकराचार्यांच्या जन्मस्थानाबद्दल जरी थोडा मतभेद असला, तरी हिंदुस्थानच्या चार टोंकाला मठ स्थापून त्यांनीं आपली कीर्ति ज्या ठिकाणीं अजरामर केली, तीं ठिकाणें त्या काळच्या प्रवासाच्या सोयीच्या मानानें त्यांच्या केरळ प्रांतांतील जन्मस्थानापासून फारच दूर होतीं.

इंग्लंडांतलें एखादें भिकार जंगली रोपटें हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या सौधावरील कुंडींत विलायती झाड म्हणून कौतुकाचा विषय होतें. कोंकणच्या कलमी आंब्याची बहार आणि वसईच्या सुकेळ्यांची खरी चव विलायतला! एका खंडांतलें विहिरीचें पाणी दुसऱ्या खंडांत औषधि पेय ठरतें! मॉरिशस बेटांतलि साखर, हिमालयन चहा गोड करते. अशी ही जगाची रीत आहे. 'ठायींच बसून करी एक चित्त। आवडी अनंत आळवावा।' हा परमार्थ आहे. पण संसारचक्राची गति वरीलप्रमाणें विलक्षण आहे. एका घरांतल्या मुलीनें उठावें, आणि दूरच्या एकाद्या घरांतील गृहलक्ष्मी बनावें. असा हा ईश्वराच्या घरचा नेमानेम आहे. समुद्राच्या पाण्यानें आकाशांत उडी मारावी आणि तेथून गिरीशिखरावर वर्षाव करून नद्यांचे वाटें पुन्हां समुद्राकडे धांवावें, असा हा स्थित्यंतररूप—प्रवाहरूप—जागतिक व्यवहार आहे. ब्रह्म हें अचल असो. पण व्यवहार अत्यंत चंचल आहे. यास्तव प्रवाहपतित प्रापंचिकाला जागचे जागींच थांबणें सुखावह होत नाहीं व व्यावहारिक दृष्टीनें शक्यहि होत नाहीं.

ज्या कोंकणचा वर विचार केला, त्या कोंकणचे पुरुषार्थवादि पुरुष जर वरील सुभाषितांतील मित्रकलत्राच्या मोहांत गुंतून घरींच राहिले

असते, तर बृहन्महाराष्ट्राला जें उज्ज्वल स्वरूप प्राप्त झालें, तें झालें असतें कीं नाहीं, याबद्दल शंकाच वाटते. रत्नागिरी जिल्हा अत्यंत खडकाळ व नापिक तर खराच. पण ह्या खडकांतून ज्ञान गंगेचे झरे निघावे व ह्यांत नररत्नांच्या खाणी सांपडाव्या, अशी विलक्षण विधिघटना दिसते. भट आणि भानू ह्यांनीं जर कोंकण सोडलें नसतें, तर भटांचें श्रीवर्धन, रोठ्या सुपारींतच संपादित झालें असतें आणि भानूंचा प्रकाश सातासमुद्रापलीकडे गेला नसता. त्याचप्रमाणें गुरुवर्य चिपळूणकर आणि लोकमान्य टिळक, न्यायमूर्ति रानडे आणि नामदार गोखले यांना पुण्याच्या राजधानीची हवा मानवली, तशी कोंकणची मानवली नसती.

मागील प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें राजापूर तालुक्यांतील पेंडखळ या खोती गांवांतील पुराणिक या घराण्यांपैकीं कांहीं पुरुषांनीं आपला भाग्योदय कोठें होतो, हें पहाण्यासाठीं कोंकण सोडलें. व कोणी साताऱ्याला, कोणी वडगांवला व कोणी कुलाबा जिल्ह्यांतील कर्जत तालुक्यांत अतकर गांवीं आले. कुलाबा जिल्ह्यांत आलेले विश्वनाथ भट बिन जगन्नाथ भट पुराणीक हे पेंडखळयाचे मूळ इनाम संपादकाचे खापर पणतू होत. त्यांच्याकडे पेंडखळची कांहीं जमीन जरी इनाम असली, तरी त्यांच्या व त्यांच्या पुढील दोन चार पिढ्यांतील वंशजांच्या नांवांत भट आणि पुराणिक हे दोन शब्द त्यांचा प्रथमपासूनचा पेशा दर्शवितात. ‘कली बळामुळें’ ‘वेदा टाकून कायदे बाची’ असा कांहीं विपरीत प्रकार ह्यांच्या घराण्यांत घडलेला नव्हता, असें दिसतें.

विश्वनाथ भटजींना लक्ष्मण भट, जयराम भट, रामकृष्ण भट, आणि नारायणशास्त्री असे चार मुलगे होते. हे चौघे किंवा यांपैकीं कांहीं प्रथम अतकर गांवीं राहण्यास आले. अतकर गांव हा कर्वे

यांचा इनाम गांव आहे. कर्वे यांचे पूर्वज होळकरांच्या सन १८०४ चे बंडाळींत कामास आले. तेव्हां त्यांच्या बायकोनें दत्तक घेऊन वंश चालविला. या बाईना पुराण सांगण्याचें काम पनवेलच्या पुराणिकांचे वंशजाकडे असे. या पुराणिकांस कांहीं थोडी जमीन कर्वे यांचेकडून सनदेनें मिळाली. अतकर गांव हें अगदींच ल्हान खेडेगांव आहे. त्यांत वीरेश्वर हें एक देवस्थान आहे. त्या देवस्थानच्या पुजेअर्चेसाठीं या गावांत ब्राह्मण वस्ती वाढावी, या हेतूनेंहि इनामदारांनीं आपलें उत्पन्न बरेंच कमी करून अनेक ब्राह्मणांस उत्तम जमिनी इनाम करून दिल्या. त्यांत त्यांनीं पेंडखळच्या पुराणिकांसहि आश्रय दिला. ह्याबद्दल तपशीलवार माहिती मला उपलब्ध झाली नाहीं. पण इतकें खरें कीं, पुराणिकांपैकीं विश्वनाथ भट बिन जगन्नाथ भट हे शंभर वर्षांपूर्वींच पनवेलीस राहण्यास आले. शके १७५२ सालीं बल्लाळेश्वराच्या पाड्यावरील वडाळें तळ्याचे कांठची चिरेखाण या नांवाचें शेत जमिनींपैकीं एक खोंची विश्वनाथ भट बिन जगन्नाथ भट पुराणिक यांना घर बांधण्याकरितां चतरसिंग इंद्रमणसिंग जमादार यांनीं दानपत्रानें बक्षीस दिली. ती जागा त्यांस अपुरी झाल्यामुळें त्या लगतची आणखी थोडीशी जागा गोपाळ आबाजी निकम कुलकर्णी यांनीं शके १७५७ सालीं विश्वानाथ भट यांस दानपत्रानें दान दिली. त्यानंतर जवळच्या जागा व घरें पुराणिक विकत घेत गेले. विश्वनाथभट हे शके १७५७ ते १७६२ यांचे दरम्यान वारले असावे. कारण शके १७६२ नंतरचे दस्तऐवज त्यांचे चिरंजीव लक्ष्मणशास्त्री, जयरामशास्त्री व नारायणशास्त्री या तिघांच्या किंवा त्यांपैकीं पहिल्या दोघांच्या नांवें झालेले आहेत.

विश्वनाथ भटजींच्या चार मुलांपैकीं फक्त नारायणशास्त्री यांसच जनार्दन व कृष्णंभट बिन नारायण शास्त्री असे दोन मुलगे होते.

बाकीचे तिघेहि निपुत्रिक वारले. त्यांपैकीं जयराम भट यांस जयराम नाना असें म्हणत. ते पुराण सांगत असत. ते हमेश अतकर गांवींच रहात असत. परंतु चातुर्मास पनवेलीस परदेशांचा राम म्हणून एक मंदिर आहे, त्या मंदिरांत ते पुराण सांगत. सन १८४९ सालचे सिंहस्थाला ते नाशिकच्या यात्रेला गेले होते. ते सन १८८३ सालीं वारले. रामकृष्ण भट व लक्ष्मण भट यांचे संबंधीं माहिती समजली नाहीं. सुमारें शंभर वर्षांपूर्वीं नारायणशास्त्री हे मुंबईस एका मराठी शाळेवर हेडमास्तर होते. त्यानीं तें काम सतत तीस वर्षें केलें व त्यानंतर दरमहा पंधरा रुपयांप्रमाणें बावीस वर्षें पेन्शन भोगलें ! यांनीं सुमारें दहा एकर जमीन व दोन घरें संपादन केलीं. हे मुंबईस असतां ह्यांचा मुंबईचे प्रसिद्ध श्रीमान् नागरिक नाना शंकरशेट यांच्याशीं विशेष घरोबा होता असें समजतें. तसेंच विश्वनाथ नारायण मंडलीक यांच्या बैठकींत ते कधीं कधीं असत, असें मंडलीकांच्या रोजनिशांवरून दिसून येतें, त्यांच्या ज्या वाटाघाटी रावसाहेब मंडलिकांचे घरीं होत असत, त्यांत एक दिवस गायनशास्त्राबद्दल बरीच वाटाघाट होऊन शास्त्रीबोवांनीं कांहीं टांचणें तयार केलीं होतीं, असें रावसाहेब मंडलीक आपल्या रोजनिशींत लिहितात.

नारायणशास्त्री यांचे वडील चिरंजीव जनार्दन नारायण हे बडोद्यास एकशें दहा रुपयांवर नोकर होते. धाकटे चिरंजीव कृष्णशास्त्री यांचा जन्म सन १८३९ चे पावसाळ्यांत झाला. यांची आई रमाबाई ही टिटवाळ्यापलीकडील घोस्टई येथील ढवळे इनामदार यांची मुलगी. हिच्याशीं त्यांचें लग्न झालें. कृष्णशास्त्री पनवेलीस लहानाचे मोठे होऊन आपला घरचा प्रपंच पाहात होते. हे कृष्णशास्त्री हेच माझ्या चरित्रनायकांचे वडील होत. मागील प्रकरणांत उल्लेखिलेल्या पळस्पें

येथील ओझे घराण्यांतील सखारामपंत ओझे यांची मुलगी कृष्णशास्त्री यांस दिली होती. कृष्णशास्त्री यांचे बंधु जनार्दनपंत हे फार दिवस पनवेलीस नव्हते. ते धंदारोजगारानिमित्त मुंबई–बडोद्याकडे कायमचेच गेले. जयराम नाना हेहि फार करून अतकर गांवालाच असत. यामुळें पेंडखळ्याच्या पुराणिक घराण्यापैकीं पनवेलीस स्थाईक असे कृष्णशास्त्रीच राहिले. पेंडखळ आणि पनवेल या स्थळांतराप्रमाणें पनवेलच्या शाखेनें आणखीहि स्थित्यंतरें घडविलीं. जनार्दन नारायण हे भटजीचे गृहस्थच बनले. त्यांचे वडील नारायणशास्त्री आणि चुलते लक्ष्मणशास्त्री व जयरामशास्त्री हे सारे भटजींचे शास्त्री झाले. कृष्णशास्त्री यांच्या शाखेंत तर याहूनहि मोठी क्रान्ति घडून आली. त्या शाखेंत वैदिकाचे वैद्य बनले! आणि ज्या चिरेखाणीचे खोच्यांत पूर्वीं भाताचे चूडहि पिकत नव्हते, तेथें शंभर वर्षांच्या आंत सोनें पिकूं लागलें! विश्वनाथ भटजींनीं शंभर वर्षांपूर्वीं पेंडखळ्याचें घर सोडलें, त्यावेळीं या प्रकरणाचे शिरोभागीं दिलेल्या सुभाषिताप्रमाणें एखाद्या नामधारी सोनुबाईचा आणि अश्रुमुक्तावलीचा वियोगाचे वेळीं संयोग झाला होता कीं काय, तें समजण्यास नक्की साधन नाहीं. पण तसें असलें तरी त्यावेळीं त्यांनीं मन घट्ट केल्यामुळें एका शतकाच्या आंत त्यांच्याच एका भाग्यशाली वंशजाच्या पुरुषार्थानें पनवेलीस गतवैभव सूचक वडाळें तळयाचे काठीं खरोखरीच सोन्यामोत्याचा धूर निघूं लागला! पुरुषाचें भाग्य सांगतां येत नाहीं म्हणतात तें तर खरेंच, परंतु कधीं भाग्योदय व्हावयाचा असेल तो होईल, असें म्हणून परिस्थितीशीं रुसून घरींच स्वस्थ बसलेल्या अभाग्याला अभ्युदयाची प्राप्ति होणार नाहीं. आणि जरी कदाचित् केवळ प्रारब्धवशात् झाली तरी तो अभ्युदय कीर्तिकर होणार नाहीं. पौरुषानें दैवगति फळते तेव्हांच सर्वांचीं तोंडें गोड होतात, आणि सर्वांकडून स्तुतीचा वर्षाव होतो.

पंडूचे पांडव म्हणून व्यासांनीं त्यांच्या पराक्रमांचें महाभारत रचलें तें ठीक झालें, तरी त्या नामधारी पांडवांचे पराक्रम पाहण्यास पंडूनें अधिक जगणें त्यास मोठेसें भूषणावह नव्हतें. पांडवांच्या पराक्रमाच्या रंगभूमीवर तो आलाच नाहीं. अगोदरच अंतर्धान पावला,हेंच ठीक झालें. सुदामदेवाला आयती सोन्याची नगरी मिळाली. तेथेंच त्याचें चरित्र संपलें. मग त्या सोन्याच्या नगरींत त्यांनीं आपल्या रत्नविभूषित बायकोबरोबर काय काय विलास केले, आणि त्याचीं पूर्वींचीं दारिद्र्याच्या उघड्या पायांनीं कष्ट करणारीं मुलें सोन्याच्या रथांत बसून रिकामपणीं कशीं सहल करूं लागलीं, हें रसभरित वर्णन करावें, असें कवींनाहि वाटलें नाहीं ! अनायासानें प्राप्त झालेल्या भाग्योदयांत वर्णन करण्यासारखा पुरुषार्थ तो काय ?

" असेल माझा हरि । तर देईल खाटेवरी । "

" कल दिया सो किने कमाया । वहां का तुझकू भजे रें ।"

इत्यादि संतवचनांत अभ्युदयाची अपेक्षा नसून बेपरवाई आहे.

' न मिळो खावया, न वाढो संतान,
परि हा नारायण, कृपा करो ॥ '

ही परमार्थ दृष्टि आहे. व्यावहारिक दृष्टि नव्हे. उत्कर्ष आणि अपकर्ष ह्या नारायणाच्या कृपासागरावरील लाटा आहेत, असें संत पाहतात. ते नारायणाच्या कृपेवांचून कांहींच जाणत नाहींत. व्यावहारिक दृष्टि वेगळी असते. व्यावहारिक दृष्टि केवळ सूत्रधाराचेच धन्यवाद गाण्यांत कृतार्थता मानीत नाहीं. नटांच्या आविर्भावांत जे कार्यकारण भाव दिसतात, त्यांतून बोध घेण्यांत व्यावहारिक दृष्टीची सफलता असते. नाटक सूत्रधाराच्या संकेताप्रमाणें घडत असतें, हें खरेंच, तरीपण ' स्वपराक्रमानें मी हा भूगोल उलथा पालथा करीन ', इत्यादि प्रकारच्या राणा भीमदेव या नटाच्या आवेशयुक्त आविर्भावांत नाटकाचा रंग असतो.

संसारांत दैवाची खुलावट पुरुषप्रयत्नानें होते. विठ्ठलमात्रेचीं पथ्यें वेगळीं व महत्त्वाकांक्षेचीं पथ्यें वेगळीं. हें नीट लक्षांत ठेवलें असतां सद्ग्रंथांची नीट संगति लागते. एरव्हीं लागत नाहीं. कोकणांतील पुराणिक या वैदिक ब्राह्मण घराण्याचे इतिहासाकडे याच दृष्टीनें पाहिलें पाहिजे.

आलस्यं स्त्रीसेवा सरोगता जन्मभूमिवात्सल्यम् ।
संतोषो भीरुत्वं षड् व्याघाता महत्त्वस्य ॥ ९५६ ॥

प्रमाण साहस्त्री.

[ आलस्य, स्त्रीसेवा, रोग, जन्मभूमीच्या ठिकाणीं प्रीतीनें पडून राहाणें, संतोष व भित्रेपणा हे सहा दोष मोठेपणाचे विरोधि आहेत. ].





# प्रकरण ४ थें.

## कृष्णशास्त्री व सखारामशास्त्री

**ते मंत्राः ब्राह्मणाधीना, ब्राह्मणो मम दैवतम्।**

सुमारें शें पाऊणशें वर्षापूर्वी आपलें ब्राह्मण्य रक्षून राहणाऱ्या ब्राह्मणांचा योगक्षेम इतरांनीं चालवावा, अशी समाजांत थोडी फार आस्था असे. याच वर्णाश्रमधर्माला पुढें अव्वल इंग्रजींत 'भटांचा जुलूम' हें नांव प्राप्त होऊन या बाबतींत 'भटां'ची निंदा करण्याचे कामीं अव्वल इंग्रजींतील कित्येक द्विजबंधूनींच विडा उचलला! मग इतरांनीं तेव्हांपासून ब्राह्मणांची हजेरी घेण्यास बिलकुल कसर केली नाहीं, यांत काय नवल?

अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह हींच ब्राह्मणांचीं षट्कर्मै खरीं. श्रेय आणि प्रेय यांपैकीं श्रेयाचीच इच्छा ब्राह्मणांनीं करावी, हेंच योग्य होय. पण ज्या मनूनें ब्राह्मणांचीं हीं षट्कर्मै नियत केलीं, त्यानेंच असेंहि ठरविलें कीं "या जगांत जेवढें म्हणून धन आहे, तें जणूं सर्व ब्राह्मणांचेंच आहे. कारण श्रेष्ठता व कुलीनता या दोन गुणांमुळें त्या सर्वांस ब्राह्मण योग्य आहे. ब्राह्मण जें कांहीं दुसऱ्याचेंहि खातो तें तो वस्तुतः आपलेंच खातो. जें वस्त्र दुसऱ्याकडून घेऊन नेसतो, तें तो आपलेंच नेसतो, व जें एकाकडून घेऊन दुसऱ्यास देतो, तेंही आपलेंच देतो. आणि असा प्रकार असल्यामुळें

केवळ ब्राह्मणाच्या करुणेमुळेंच इतर जन भोजनादि करितात" [ मनु. १–१००–१०१ ] ही वर्णव्यवस्था व समजूत आतां राहिली नाहीं. आणि हें प्राचीन मनूचें वचन या नव्या मनूंत कोणीहि मानावयास तयार नाहींत. यांत दोष ब्राह्मणांचा किती व अब्राह्मणांचा किती, याची चिकित्सा येथें कर्तव्य नाहीं; तरी पण इतकें म्हणावें लागतें कीं वास्तविक कोणत्याहि समाजांत वरील प्रकारच्या कार्यास सर्वस्वी वाहिलेला असा एक श्रेष्ठ वर्ग असणें व त्याच्या योगक्षेमाची इतरांनीं काळजी घेणें, ह्यांत गैर कांहींच नाहीं. उलट समाजाच्या संस्थितीस अशी व्यवस्था अत्यावश्यकच आहे. परंतु पोट आणि अवयव यांच्या काल्पनिक भांडणाप्रमाणें जीवनार्थ कष्ट व कामधाम करणाऱ्या वर्गास आयतें खाणारा वर्ग सहजच पाहवत नाहीं.किंवा क्वचित् आपमतलबी तिऱ्हाईतांकडून अशा प्रकारच्या मत्सराची हेतुपुरस्सर प्रेरणाहि होत असते. यामुळें वर्णव्यवस्था बिघडते. पूर्वींहि ब्राह्मण पुरोहितांचा चरितार्थ इतरांनीं आयता चालवावा ह्या गोष्टींचें जें सर्वांना अतिशय वैषम्य वाटत असे, तसें ब्राह्मणांना विशेष कांहीं मिळत असे, असें नाहीं. पण हिंदुस्थानांतील या एका श्रेष्ठ राजकारणपटु व चळवळ्या वर्गाबद्दल इतरांच्या मनांत अनादर उत्पन्न होऊन परभारें त्यांच्याकडून ह्या ब्राह्मण वर्गाचा नकशा उतरून तो भिकेस लागला, तर सुंठीवांचून खोकला गेला, असें कुटिल राजनीतीस वाटत असावें, असें दिसतें. ब्राह्मणांबद्दल येथील साऱ्याच परकीय राज्यकर्त्यांना एक प्रकारचा वचक वाटत असे. तेव्हां हा वर्ग हतबल व तिरस्कृत झाला, म्हणजे हिंदुस्थानचें राज्य हांकणें बरेंच सोपें जाईल, असें त्यांस वाटत असावें, असें ऐतिहासिक ग्रंथांवरून दिसतें. एरव्हीं ब्राह्मणांचा इतरांनीं मत्सर करावा, अशी ब्राह्मणांनीं सत्ता व संपत्तीची हांव फार करून कधींच धरली नाहीं. पेशवाईत ब्राह्मणांचें प्राबल्य थोडें वाढलें असेल ही

गोष्ट खरी. तरी त्या वेळीं तसें होणें अगदीं स्वाभाविकच होतें. यामुळें पेशवाईच्या कारकर्दितिं कुटुंबवत्सल, सच्छील ब्राह्मणांनीं श्रीमंतांचें अभिष्टचिंतन करीत सुखानें राहावें, यासाठीं कोठें त्यांस लहान गांवें इनाम दिलेलीं आढळतात. पण अशा ठळक देणग्या क्वचितच कोणास मिळत. निदान माझ्या चरित्रनायकाच्या पूर्वजांना जीं कांहीं इनामें, व दानें मिळालीं, तीं त्यांचा चरितार्थ भागण्यास मुळींच पुरेशीं नव्हतीं. यामुळें माझ्या चरित्रनायकाचे आजे नारायणशास्त्री यांस मुंबईस अध्यापकाची नोकरी पत्करावी लागली व त्यांचे वडील चिरंजीव जनार्दन हेहि भटाचे पंत बनले. जयरामनाना यांस अतकर-गांवच्या शेतीचा आधार होता. शिवाय ते चातुर्मास पनवेलीस पुराणहि सांगत. पण कृष्णशास्त्री हे जमिनदारहि नव्हते व भिक्षुकहि नव्हते. यामुळें त्यांना आपला पनवेलचा प्रपंच फारच काटकसरीनें चालवावा लागला. त्यावेळचे त्यांचे हातचे जमाखर्च पाहिले म्हणजे त्यांची गरिबी, व त्यांचा व्यवस्थितपणा हे दोन्हीहि गुण स्पष्ट दिसून येतात. त्यांच्या जमाखर्चाला उतरलेली शिल्लक बरेच दिवस पाचपंचवीस रुपयांहून कधींच जास्त नसे. कधीं कधीं शिल्लक खुंटली असतां आईच्या बारोज्यांतूनहि त्यांना दोन चार रुपये उसनवार घ्यावे लागत. कृष्णशास्त्री भिक्षुकी करीत नसत व पुराणिकाचाहि धंदा असा करीत नसत. तथापि कारणपरत्वें श्री. बापट, बर्वे व शेट विठोबा खंडाप्पा गुळवे यांच्याकडे व क्वचित् इतरांकडे सत्यनारा-यणादि व्रतवैकल्याच्या पोथ्या वगैरे वाचण्यास ते मधून मधून जात. कै. विठोबा शेट यांचेकडून त्यांस सालाचे पन्नास रुपयांचें वेतन होतें. शास्त्रीबुवांचा हिशेब इतका काटेकोर असे कीं, त्यांना मिळालेली दक्षणा तर ते जमा करीतच, पण पुढें क्वचित् मुलांस कोठें भोजनदक्षणा मिळाली तर तीहि त्यांच्या खातीं जमा करीत

असत. तसेंच वर लिहिल्याप्रमाणें घरांतील स्त्रियांच्या बारोजांतून कधीं कांहीं उसनवार केली, तर ती रकम त्यांच्या नांवावर जमा होत असे. प्रपंच अगदीं साधा व गरिबीचा असतां त्यांत खाजगी जमाखर्च इतका व्यवस्थित ठेवण्याची पद्धत आज काल क्वचितच कोणाकडे असल. बहुतेक ठिकाणीं आहे ती शिल्लक व गेला तो खर्च, असाच अनास्थेचा प्रकार असतो. आम्हाला जमाखर्च लिहून कोणाला दाखवावयाचे आहेत. हें एक कारण जमाखर्च न ठेवणारे सांगत असतात. पण तें अगदींच फोल आहे. जमाखर्च हा गृहस्थाश्रमांतील आर्थिक दृष्टीचा आरसा आहे. जमाखर्च लिहिण्यास श्रीमंतीच पाहिजे असें नाहीं. ज्याला आपल्या प्राप्तींत प्रपंच चालवावयाचा असेल, त्यानें जमाखर्च अवश्य ठेवला पाहिजे. तरच त्यास काटकसर कोठें कशी करावी, तें लक्षांत येऊन दुसऱ्याचें कर्ज काढण्याचा फार करून प्रसंग येणार नाहीं. व प्रसंग विशेषीं तसा प्रसंग आला तरी तो त्यांतून धिमेपणानें पार पडून निष्कर्जी होईल.

कृष्णशास्त्री हे मूळचे गरीब तर खरेच. त्यांच्या वडिलांच्या पगारांतून व पुढें पेन्शनांतून त्यांना कुटुंबखर्चास दरमहा दहा पंधरा रुपये मिळत. पण ते त्यांस प्रपंचखर्चासंबंधीं निश्चिंत करण्यास पुरेसे नव्हते. तरी ते संतोषवृत्तीनें प्रपंच चालवीत असत. ते जरी गरीब होते, तरी त्यांच्या सौजन्यामुळें, सच्छीलामुळें व सार्वजनिक कामांत निरलसपणें मन घालण्याच्या त्यांच्या गुणांमुळें त्यांची गांवांत इभ्रत श्रीमंतांपेक्षांहि जास्त होती, निदान कमी नव्हती, असें दिसून येतें. आपल्या धर्मशास्त्रांत गृहस्थाश्रमाची महति फारच वर्णिली आहे. याचें एक कारण आपल्या धर्मशास्त्रांत व आयुर्वेद शास्त्रांत जी दिनचर्या सांगि-

---

दिनचर्याः—सामान्य निरोगी माणसाची दिनचर्या कशी असावी याबद्दल आर्य वैद्यक ग्रंथांत पुढीलप्रमाणें नियम आहेत. पहांटे चार घटका रात्रीं उठावें नंतर शौच-

[पुढील पान पहा]

तली आहे,त्या दिनचर्येंतच फार महत्त्व आहे. कृष्णशास्त्री यांची दिनचर्या अगदीं रेंखीव व नमुनेदार असे. सकाळीं शौचमुखमार्जनादि प्रातःकर्म झाल्यानंतर ते व सखारामशास्त्री बरोबरच किंवा कधीं कधीं दोघे गांवाचे दोन विभागांत वेगळे,त्यांच्या नेहमींच्या ग्राहकांच्या घरीं जाऊन शोध समाचार घेऊन व औषध योजना करून येत असत. नंतर संध्या

---

( मागील पानवरून चालू )

मुखमार्जन करून रुई, वड, खैर, करंज, अर्जुन सादाडा इ० झाडांच्या मृदु टोंकाच्या काड्या हिरड्यांना इजा न होईल अशा बेतानें चावाव्या. डोळ्यांत सुरमा घालावा. आठवड्यांतून एकदां रसांजन (दारु हळदीचा रांधा) डोळ्यांत घालावें. अंगास तेल लावावें. विशेषेंकरून कानांत तेल घालावें व पायास आणि डोक्यास लावावें. सकाळीं व्यायाम करावा. नंतर अंग रगडून घ्यावें. अंगाला उटणें लावून मग स्नान करावें. थंड पाण्यानें डोकें भिजवावें व खांद्याखालून ऊन पाणी घ्यावें. पूर्वींचा आहार जिरला म्हणजे पथ्यकर व नियमित प्रमाणानें जेवावें. निरंतर धर्मपर असावें. [ म्हणजे सुप्रभात उठून भूपाळ्या, हरिपाठादि अभंग, प्रातःस्मरणाचे श्लोक घरांतील मुलांमाणसांस ऐकूं जातील अशा रीतीनें सावकाश गोड व गंभीर स्वरांत म्हणावे. पुढें स्नान करून वर्णाश्रमविहीन नित्यनैमित्तिक कर्में यथास्थित करावीं. नंतर भगवद्गीता,रामगीता, उपनिषदें, पठणाचे ग्रंथ, यांपैकीं कांहीं नियमित भाग वाचावा व त्याचें चिंतन करावें. मग वर्णाश्रम विहीत चरितार्थ साधन करावें. नंतर गृहिणीनें शुचिर्भूतपणें सात्विक अन्नाचा स्वयंपाक केल्यानंतर नैवेद्य वैश्वदेव करावा, त्रिसुपर्णाचा पाठ म्हणावा. योग्य अतिथि अभ्यागत पहावा. व सर्वांचें भोजन झाल्यानंतर यजमान व यजमानपत्नि यांनीं राहिलेला अवशेष ईश्वराचा प्रसाद म्हणून संतोषानें ग्रहण करावा. भोजनोत्तर थोडी विश्रांति घेऊन चरितार्थाचा व्यवसाय पहावा. त्यांत सवड झाल्यास भारत भागवतादि पुराणांचें किंवा दुसऱ्या धार्मिक ग्रंथांचें श्रवण करावें. सायंकाळीं सन्मित्रांच्या भेटी देवदर्शन करून घरीं यावें. मग संध्यावंदन धूपार्ति करून अल्पहार करावा. नंतर हिशेबी लिहिणें पुरें करून संतांचे ग्रंथ, सत्पुरुषांचीं चरित्रें वाचावीं व घरांतील मंडळीस ऐकवावी देवाचें भजन करावें. अखेर साऱ्या दिवसांत आपल्या हातुन ज्या कांहीं बऱ्यावाईट गोष्टी झाल्या असतील, त्या ईश्वरास निवेदन करून कृतापराधांची क्षमा मागावी. ( सोय असेल तेव्हां हरिकीर्तनास जावें. ) सज्जनांची संगति अवश्य धरावी, अर्थात् दुर्जनाशीं टाळावी. हिंसा, चोरी, व्यभिचार, चहाडी, असत्य, अप्रिय व असंबद्ध भाषण, दुसऱ्याचा नाश करण्याची बुद्धि, मात्सर्य, शास्त्र-

[पुढील पान पहा]

पूजादि नित्यकर्म करीत. शास्त्रीबोवांच्या मस्तकशूळाच्या व्यथेमुळें ते लवकरच जेवीत. रोज श्रीबल्लाळेश्वराचा महानैवेद्य ते स्वत: देवळांत नेऊन देवाला दाखवीत. त्यावांचून कधीं अन्नग्रहण करीत नसत. ते ब्रह्मकर्मांत फार दक्ष असत. तसेंच अतिथीअभ्यागतहि चांगले राखीत. घरीं कोणी पाहुणा असला तर त्याची व्याख्याप्रमाणें बरदास्त असे. भोजनोत्तर ते थोडी वामकुक्षी करीत. त्यांना चहा, पान, तंबाखु वगैरे

---

( मागील पानवरून चालू )

विरुद्ध विचार हीं दहा प्रकारचीं पापकर्मे यांचा कायावाचामनानें त्याग करावा. गरीब, व्याधिष्ट व दुःखित यांना यथाशक्ति सहाय्य करावें. देव, गो–ब्राह्मण, वृद्ध, वैद्य, राजा व अतिथि यांची यथायोग्य पूजा करावी. याचकास विन्मुख करूं नये. संपत्ति व विपत्ति यांत समवृत्ति ठेवावी. चांगल्या गुणांची ईर्षा धरावी. हितकारक, थोडें, गोड, सत्य व प्रसंगोचित भाषण करावें. सुजनतेनें वागावें. आपला अपमान जनांत सांगूं नये, इंद्रियांच्या अत्यंत स्वाधीन होऊं नये व त्यांना अति क्लेशहि देऊं नये. ज्यांत॰ धर्मार्थकामापैकीं कोणताच इतराविरोधी पुरुषार्थ नाहीं, असा उद्योग करूं नये. सर्व प्रकारच्या मद्यासंबंधीं कसलाच व्यवहार करूं नये.

पूर्वेकडचा वारा, सकाळचें ऊन, धूळ, पाऊस व तीव्र वायु यांचें सेवन करूं नये. नीच व अति शहाणे यांची सेवा करूं नये. बलिष्ठांशीं वैर करूं नये. स्त्रियांवर विश्वास ठेवूं नये. व त्यांस स्वातंत्र्य देऊं नये. शहाण्यानें लोक वागतील त्याप्रमाणें लौकिक गोष्टींमध्यें विचारपूर्वक वागावें. सर्व भूतांवर दया, दान, कायिक, वाचिक, मानसिक क्रियांवर दाब, लोकांच्या कामामध्यें स्वतःप्रमाणें कळकळ इतक्या गोष्टी पाळणें, हेंच श्रेष्ठ व्रत होय. मी काय करितों आहे, कोठें आहें, माझें वय काय, माझें मन कशांत गुंतलें आहे, हें क्षणोक्षणीं ध्यानांत आणावें. हा थोडक्यांत सदाचार सांगितला. ह्याप्रमाणें जो आपली वर्तणूक ठेवतो, तो आयुरारोग्य, ऐश्वर्य, यश व मोक्ष पावतो. धर्माचरणांत अत्यासक्ति व अनासक्ति नसावी. नखें, केश, दाढी-मिशा फार वाढूं देऊं नये. रोज स्नान करावें. स्वच्छ व नम्र वेष धारण करावा. रत्नें सिद्ध मंत्र यांना धारण करावें. चालतांना चारच हात पुढें नजर ठेवावी. अनवाणी चालूं नये. रात्रीं किंवा कठीण प्रसंगीं जाणें झाल्यास डोकें बांधून हातांत काठी घेऊन व बरोबर कोणी सोबत घेऊन जावें. पूज्य व नीच वस्तूंची व व्यक्तींची छाया ओलांडूं नये. नाक कोरीत बसूं नये. जमिनीवर उगाच रेषा काढूं नये. उकीडवें फार वेळ बसूं नये. कायिक, वाचिक व मानसिक क्रिया श्रम होण्यापूर्वीच बंद कराव्या. झाडाखालीं राहूं नये. देवळांत, चवाठ्यावर, पिंपळाजवळ निजूं नये. दैदिप्यमान व अप्रिय पदार्थांकडे एकसारखें पाहूं नये.

कसलेंहि व्यसन नसे. थोडी वामकुक्षी केल्यावर ते भारत–भागवत पुराण घरींच वाचीत बसत. कोणी श्रोता जवळ असला तर त्यास समजावून सांगत. कोणी विद्यार्थी संस्कृताचे अध्ययनासाठीं आल्यास, त्यास प्रेमानें आस्थापूर्वक शिकवीत. सखारामशास्त्री यांना मुलांचा फार ळळा असे. संध्याकाळीं शास्त्रीबोवा पुन्हा गांवांत फेरी मारीत. कोठें नैमित्तिक पुराण वाचण्यास बोलाविल्यास जात असत व देवदर्शन करून घरीं येत.

पूर्वींच्या काळच्या शिष्टांच्या दिनचर्येंत व आजच्या शहरवासी आधुनिकांच्या दिनचर्येंत जें एक महत्त्वाचें अंतर दिसतें, तें हें कीं, आपण ईश्वराच्या नियंत्रणांत व धर्मबंधनांत आहों याची अखंड जागृति पूर्वींच्या दिनचर्येंत दिसून येते. त्याचा हल्लींच्या दिनचर्येंत मागमूसहि नसतो. वाचकांच्या मनोविनोदार्थ आज पुण्यपत्तन, मुंबा- पुरी इत्यादि शहरांतील पुढारलेल्या आधुनिकांना मंजूर असलेली, निदान नामंजूर नसलेली दिनचर्या तुलनेकरितां पाहूं या.

प्रौढ माणसांची दिनचर्या पाहिल्यास उजाडल्यावर उठावें, हंथरु- णांतच पहिला चहा घ्यावा. तसेंच आराम खुर्चीवर बसून रोजच्या दैनिकांतून साऱ्या जगांतील तंटे, अपघात वगैरे चित्तक्षोभ करणाऱ्या बातम्या वाचाव्या. मग वाटल्यास पुन्हां चहा घ्यावा किंवा पाव- वाल्यानें आणलेले पाव, केक, बिस्किटें वगैरे घरींच किंवा हॉटेलांत जाऊन खावीं. मग स्वतांच दाढी करावी, वाटल्यास मिशाहि काढाव्या. वेळ असल्यास अंघोळ करावी. नाहींतर चेहरा धुऊन तसेंच आणखी कांहीं खाऊन ऑफिसांत जावें. सायंकाळीं घरीं आल्यावर घरचें किंवा हॉटेलांतलें मागविलेलें पुन्हां खावें प्यावें. क्लबांत जावें किंवा–देवदर्श- नास वगैरे नव्हे तर,–‘ वृथाटव्य ’ करण्यास जावें, किंवा ‘ केरम ’ ‘ ब्रिज ’ खेळत बसावें. नाहींतर पुन्हां सायंकाळचीं वर्तमानपत्रें आणि

सिगारेटचें अग्निहोत्र हें नित्यकर्म आहेच. त्यांतच कधीं कधीं आणखी सिनेमाला किंवा नाटकाला जावें व घरीं आल्यावर निजावें. ही सुधारलेल्या शहरनिवासी सुशिक्षितांची सर्व साधारण दिनचर्या असते. निदान या दिनचर्येंत आधुनिकांस नापसंत किंवा तिटकारा येण्यासारखें कांहीं नसतें. यामुळें हीच रीत घरांतील लहान मुलें व विद्यार्थी उचलतात. ह्या जुन्या नव्या दोन्ही दिनचर्यांची निर्विकार मनानें तुलना करावी आणि मग "पूर्वपरंपरा अगोदर तोडा" म्हणून टाहो फोडणारे आजचे विद्वान पुढारी किती आत्मघातकी आहेत, त्याचा विचार करावा. मी जें वर आजच्या दिनचर्येचें चित्र रेखाटलें आहे, त्याला अपवादहि अनेक असतील. पण या अपवादांचें एक महत्त्वाचें कारण व्यक्तीव्यक्तींतील सात्विक भावाप्रमाणें पूर्व संस्कारांचें प्राबल्य हेंहि असूं शकतें, हें विसरून चालणार नाहीं. हा असाच जरी काल पुढें चालला तरी पूर्व संस्कारांचे अवशेष अगदीं नाहींसे होण्यास दिनावधीच लागेल, हें उघड आहे. अजून आमच्यांत हिंदू हें वैशिष्ट्य आहे. ही आमच्या वाडवडिलांची पुण्याई होय. पूर्व परंपरा जीवंत असेल तोंवर पाळावी असें कोणी मवाळ आधुनिक म्हणतात. पण या त्यांच्या मानभावीपणांत कांहींच अर्थ नसतो. कारण परंपरेला अगोदर सुरुंग लावावयाचे आणि मग ती जीवंत असेल तर पाळावी, असेंहि म्हणावयाचें हें अप्रामाणिकपणाचें आहे. पूर्वींच्या दिनचर्येंत देशकाल मानानें फरक होत जाणें स्वाभाविक व अपरिहार्य आहे. पण पूर्वींच्या दिनचर्येंत एक शास्त्राची सरणी दिसते. आजची दिनचर्या म्हणजे धर्महीन स्वैराचार होय! इतकेंच मला दाखवावयाचें आहे. असो. प्रकृतम् अनुसरामः

कृष्णशास्त्र्यांचे वेळीं पनवेलींत विठोबा खंडाप्पा शेट हे लिंगायत व्यापारी गांवचे एक प्रमुख पुढारी असत. ते लिंगायत होते तरी त्यांचे

धार्मिक रिवाज बरेच पौराणिक हिंदू पद्धतीचे असत. त्यांच्या घरच्या बायकाहि पौराणिक पद्धतीचीं व्रतवैकल्यें करीत. विठोबाशेटनां औरस मुलगा नव्हता. त्यांची एकुलती एक मुलगी शिऊबाई त्यांची फार लाडकी असे. या बाईचा ब्राह्मण आळींतील स्त्रियांतहि विशेष घरोबा व वजन असे. हरितालिका व्रताचे दिवशीं व अशाच अन्य प्रसंगीं कृष्णशास्त्री यांस विठोबा शेटकडे पोथी वाचावयास जावें लागे. या शिऊबाईला प्रदराचा विकार होता. कृष्णशास्त्री यांनीं त्यासाठीं प्रदररिपू हें औषध तयार करून त्यांस दिलें. त्याचा विलक्षण उपयोग झाला. त्यांस त्यानंतर लवकरच मुलगा झाला. तेच हल्लींचे श्री. आत्माराम महादेव आटवणे हे होत. हेच पुढें विठोबा शेटच्या गादीवर बसले. वरील गोष्टीचें कायमचें स्मारक म्हणून विठोबा शेटनीं कृष्णशास्त्री यांस आपल्या बागेंतील त्यांच्या वडिलांच्या समाधिजवळचेंच एक मोठें कलमी अंब्याचें झाड वहिवाटीस बक्षीस दिलें. तसेंच त्यांच्या जावयांकरितां च्चलरसिंग जमादार याचें घेतलेलें घर शास्त्रीबोवांच्या घरालगत त्यांस सोयीचें होतें म्हणून तें त्यांस विकत दिलें. हल्लीं कारखान्याचें वनौषधि खातें त्याच जागीं असलेल्या सुधारलेल्या इमारतींत आहे.

पनवेलीस बापटांचें घराणें जुन्या नामांकितांपैकीं प्रमुख होतें. त्यांच्या येथें गोकुळाष्टमी व इतर कांहीं दिवशीं शास्त्रीबोवांस पोथी वाचण्यास जावें लागे. ब्राह्मण मंडळींत सखाराम खंडेराव ऊर्फ बापूसाहेब बर्वे हे एक वृद्ध पेन्शनर नागरिक सुखवस्तु असून धार्मिक वृत्तीचे असत. त्यांच्याकडे कथा, पुराणें, मंत्रजागर नेहमीं कांहींना कांहीं तरी सुरू असे. त्यांच्याकडेहि शास्त्रीबोवांचें विशेष जाणें असे.

कृष्णशास्त्री हे मितभाषी असत. त्यांचा भारत, भागवत या ग्रंथांवर बराच व्यासंग होता. त्यांच्या संभाषणांत भारत भागवतांतील

श्लोक नेहमीं येत असत. त्यांच्याकडे संस्कृत काव्य वाचण्याकरितां कांहीं गृहस्थ येत. त्यांत आधुनिकांतील एक सुप्रसिद्ध कवि मोरो गणेश लोंढे मास्तर हे कधीं कधीं येत असत. त्यांचें शिकविणें फार कळकळीचें, व दुसऱ्याशीं वर्तन फारच सौजन्यपूर्ण असे. पुराणिक कुटुंबाची गृहस्थाश्रमाची रीत महाराष्ट्रांत क्वचितच ठिकाणीं पहावयास मिळेल, असे उद्गार अनुभवी वृद्धांचे तोंडून ऐकूं यत. त्यांच्याकडील पाहुणचार फारच अगत्याचा व टापटिपीचा असे. कोणी पाहुणा आला तरी त्याच्या पानाशीं रांगोळी उदबत्ती अशी आदरातिथ्याची त्यांची शिस्त असे. त्यांचे चुलते जयराम नाना यांचा शुचिर्भूतपणा विशेष असे. ते फार करून दिवसभर सोवळेंच असत. शूद्रांना कधींच शिवत नसत. ते सन १८८३ सालीं वारले. तेव्हां त्यांचें वय ९५ वर्षांचें होतें. कृष्णशास्त्री यांच्या स्वास्थांत त्यांची कपाळदुखी हें एक मोठेंच वैगुण्य होतें. यामुळें त्यांचें जेवण सकाळीं दहा वाजतां व्हावयाचें, तें कधीं चुकत नसें. ते तिखट खात नसत. तीच परंपरा पुढेंहि सुरू राहिली. कृष्णशास्त्री यांच्या प्रकृतींतील हें वैगुण्यहि पुढें अप्रत्यक्ष रीतीनें त्यांच्या अभ्युदयासच कारण झालें.

कृष्णशास्त्री यांचे एक लांबचे आतेभाऊ सखारामशास्त्री नावलेकर या नांवाचे होते. नारायणशास्त्री हे त्यांच्या आईचे मामेबंधु लागत. त्यांचा जन्म शके १७४५ सालीं कोकणांत वणगुलें येथें झाला. ते विद्याभ्यासाठीं सुमारें एक तप पुणें येथें होते. त्यांचा विद्याभ्यास पुणें येथें पाठशाळेंत झाला. वे. शा. सं. नृसिंहशास्त्री शेजवळकर व व राजवाडे हे त्यांचे समकालीन होते. ह्यांनीं व्याकरणाचा अभ्यास केला. व पुढें वैद्यक ग्रंथ स्वतांच पाहून ते वेद्यक क्रिया करूं लागले. ते फिरत फिरत पनवेल येथें शके १७७५ सालीं आले. व तेथेंच त्यांचा अन्नोदक ऋणानुबंध असल्यामुळें ते अखेरपर्यंत पनवेलीसच

राहिले. तेथें त्यांनीं आपल्या सच्छीलतेबद्दल आणि वैद्यकीय ज्ञानाबद्दल चांगला लौकीक संपादन केला. ते कधीं कृष्णशास्त्री यांचे घरीं तर कधीं स्वतंत्र बिऱ्हाड करून राहात असत. सखारामशास्त्री हे फार प्रेमळ असत. घरांतील मुलाबाळांस त्यांच्याकडून नेहमीं खाऊ मिळे. कृष्णशास्त्रयांची मस्तकशूलाची व्यथा पाहून त्यांनीं त्यांस वैद्यकी शिकण्याचा आग्रह केला. त्याप्रमाणें कृष्णशास्त्री यांनीं सखारामशास्त्री यांचे जवळ वैद्यकीचा अभ्यास केला.

सखारामशास्त्री यांना औषधि तयार करण्याच्या क्रिया माहीत होत्या. पण ते अगदीं साधे भोळे होते. कृष्णशास्त्री फार व्यवस्थित, व्यवहारी व धूर्त होते. उभयतांनीं एकमेकांच्या उणिवा भरून काढल्या व कृष्णशास्त्री व सखारामशास्त्री पनवेलींत इ. स. १८६६ पासून वैद्यकी करूं लागले. पळस्पें, शिरढोण, गुळसुंदें वगैरे शेजारच्या खेड्यांतूनहि लोक त्यांच्याकडे औषधाला येऊं लागले. पुढें कृष्णशास्त्री यांनीं सुमारें वीसबावीस औषधें तयार केलीं.[1]

कृष्णशास्त्री यांच्या वैद्यकीच्या अभ्यासाला त्यांचा मस्तकशूल हें जसें आपाततः निमित्त कारण झालें, त्याचप्रमाणें आणखी एक लहानशी गोष्ट त्यांच्या वैद्यकीस आर्यौषधि कारखान्याचें स्वरूप येण्यास निमित्त कारण झालें. एकदां एका रोग्याला कृष्णशास्त्री यांनीं औषधियोजना करून काढ्याची यादी टिपून दिली. त्या रोग्याचा आप्त त्याच दिवशीं अपरात्रीं शास्त्रीबोवांकडे धावऱ्या धावऱ्या आला व

१ हेमगर्भ, सुवर्णमालिनी, महालक्ष्मीविलास, वसंत कुसुमाकर, सुवर्णराजवंगेश्वर मेहांतक रस, कुसुमाकर, चतुर्मुख, पंचवक्त्र नवानंद भैरव, आनंद भैरव [कासावर], संन्निपात भैरव, महाज्वरांकुश, राजचंडेश्वर, त्रिभुवनकीर्ति, अग्निसुत, अभ्रक, लघुमालिनी, सूतशेखर, गंधक रसायन, माक्षिकभस्म, श्वासकुठार, पंचामृतपर्पटी, प्रवाळ, नागभस्म, शंखभस्म, आनंद भैरव [अतिसारावर], लवंगादिवटी, बोलबद्धरस, प्रतापलंकेश्वर, लोकनाथरस, लोहभस्म, कामदुधा, मंडूर, योगराजगुग्गुळ, गुळवेलसत्त्व, शूलकुठार, जातिफलादिगुटिका, डाळिंबपाक, मोठ्या शिंपांचें भस्म.